## रिझर्व बँकेचे धोरण

रिझर्व बँकेच्या धोरणानुसार बँकांचा व्याजाचा दर वाढला आहे आणि त्यांच्या कर्जावर बरीच मर्यादा पडली आहे. हे धोरण भाववाढ रोखण्यासाठी अवलंबिणे भाग होते. पण धंद्यांना मिळणारी कर्जे कमी झाल्यामुळे आणि महाग पडल्यामुळे धंद्यांनी उत्पादनात हात आखडता घेतला.

## काही धंद्यांच्या अडचणी

काही धंद्यांच्या अडचणी अगदी स्वतंत्रपणे उद्भवल्या आहेत. सुती कापडाच्या गिरण्या यंत्रांच्या आधुनिकीकरणाकडे अनेक वर्षे दुर्लक्ष करीत आहेत. कापडाच्या किंमती कह्यात ठेवावयाच्या, इतर प्रकारच्या कापडाशी स्पर्धा करावयाची तर त्यांनी उत्पादनखर्च कमी केला पाहिजे – येथे जुनी यंत्र-सामग्री आड येते. जवळजवळ २०० गिरण्यांना यंत्रांच्या आधुनिकीकरणासाठी ३०० कोटी रुपये लागतील असा अंदाज आहे ! कोल्हापूर भागातील इंजिनांच्या धंद्यात इंजिनांची मागणी स्थिर रहाणे अशक्य आहे. ज्या शेतांवर इंजिने बसविणे परवडण्या-सारखे आहे तेथे ती बसविल्यावर त्यांची मागणी आणखी कशी वाढणार ? तसेच ज्या वर्षी शेतकऱ्याच्या हाती पैसा येत नाही किंवा त्याला तगाई मिळत नाही त्या वर्षी तो इंजिने कशी विकत घेणार ? ज्या गावी वीज जाते त्या गावी विजेची मोटर बसविणे इंजिन बसविण्यापेक्षा स्वस्त ठरते. ह्या धंद्यातील उत्पादकांचा विचार केला तर असे दिसते की हे उत्पादकही संख्येने फार आहेत. उत्पादकांच्या मानाने दुरुस्ती करणारे कमी असेही वाटते. वरीचशी इंजिने दुरुस्त करण्याची फार लवकर पाळी येते ! उत्पादकांमध्ये जसे मोठे कारखानदार आहेत त्याप्रमाणे वरेचसे भाग एकत्र जमवून वेगळ्या नावाचे इंजिन काढणारे लहान कारागीर आहेत. सुटे भाग मिळविताना लहान कारागिरांचा खर्च वाढतो. मोठा कारखानदार ह्या कारागिरांकडे मदत करण्याच्या दृष्टीने पाहातो असे दिसत नाही.

## उपाययोजना

मंदीच्या विश्लेषणाकडून उपाययोजनेकडे वळताना हे स्पष्ट केले पाहिजे की भाववाढ रोखणे ही समाजाची फार मोठी गरज आहे. भाववाढीवर उपाय योजताना धंद्यांना थोडीशी झळ लागणारच. काही धंद्यांचे उत्पादन कमी करून इतर धंद्यांचे उत्पादन वाढवावे लागेल. ह्या फेरजुळणीत (रिॲडजस्टमेंट) थोडाफार त्रास आहेच. पण भाववाढ आवरताना हा त्रास भोगावाच लागतो – ही किंमत द्यावीच लागते असा इतर देशांचा अनुभव आहे. गेल्या वीस पंचवीस वर्षांत अस्तित्वात असलेले धंदे सुखेनैव पुढे तसेच चालत राहतील असे समजता येत नाही. त्यांच्या संघटनेत आणि उत्पादनप्रकारात लवचिकपणा ठेवावाच लागतो. असा लवचिकपणा ठेवणे हा धंद्यातील कर्तृत्वाचा महत्त्वाचा भाग आहे.

## सबसिडी ?

सरकारने प्रत्येक धंद्याला त्याच्या त्याच्या दडपणा-प्रमाणे मदत करीत रहावे हा उपाय दूरदृष्टीने समाजविघातक आहे. अशी 'ॲडहॉक' मदत म्हणजे अकार्यक्षमतेस 'सबसिडी' किंवा संरक्षण होय ! समाजाचा आर्थिक विकास अकार्यक्षमता जोपासून होणे अशक्य होय. तगाई हे ह्या प्रकारचे अगदी सोपे उदाहरण आहे.

## कर कमी करणे ?

धंद्यावरील कर कमी करावे अशी मागणी होणे साहजिक आहे. पण ही मागणी मंजूर करणे शक्य होणार नाही. आजच केन्द्र सरकारला आणि राज्य-सरकारांना पैशाची चणचण भासू लागली आहे. भाववाढीमुळे वाढलेला खर्च हे त्याचे एक न्याय्य कारण आहे. सरकारला संरक्षणाचा आणि आर्थिक विकासाचा खर्च करीत राहणे भाग आहे. हा खर्च करीत असताना तुटीचा अर्थभरणा यापुढे करावयाचा नाही. मग पैसा कररूपानेच उभा करावा लागेल. सामान्य माणसावरील करांचा बोजा खूप वाढला आहे ह्यांत शंकाच नाही. प्रत्येक अंदाजपत्रकाने हा बोजा वाढविला आहे. सामान्य माणसाचे गाऱ्हाणे मांडण्यासाठी एखादे शिष्टमंडळ राजधानीस गेल्याचे दिसत नाही. धंद्यावरील करांच्या बाबतीत मात्र शिष्टमंडळे जाताना दिसतात. धंद्यांवरील करांच्या बाबतीत दोन दृष्टींनी विचार करावा. एक, धंद्यां-वरील कर धंद्यांवर किती पडतात आणि गिऱ्हाइकांवर किती सरकविले जातात ? दुसरा विचार असा की हे कर देऊनही जो नफा राहातो तो ह्या देशातील






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

एकंदर परिस्थितीच्या मानाने कमी आहे काय? तिसरीही दृष्टी आहे, ती अशी : जो नफा मिळतो तो माणसांच्या कर्तृत्वावर किती आणि बाजारपेठेच्या परिस्थितीवर किती ?

## परदेशी बाजारपेठ

परदेशी बाजारपेठेवर सरकारची आणि उद्योगपतींची वरीच मदार आहे. परदेशी चलन मिळविणे अत्यंत निकडीचे असल्यामुळे परदेशी बाजारपेठेकडे वळणे बरोबर आहे. पण स्वदेशात गिऱ्हाईक नाही म्हणून परदेशाकडे वळणे हे समाजास घातक आहे. स्वदेशात गिऱ्हाईक आहे, त्याला फक्त किमती परवडत नाहीत हे सत्य होय. बरे, परदेशात तरी आपल्या किमती स्पर्धेत टिकतात काय ? ह्या बाबतीत साखरेची कथा सर्वश्रुत आहे. इंजिनांच्या बाबतीत शंतनुराव किर्लोस्करांनीच सांगून टाकले आहे की परदेशी बाजारपेठेत विकलेल्या प्रत्येक इंजिनावर १५० रु. खोट बसते आणि हा फरक स्वदेशी बाजारपेठेत भरून काढावा लागतो ! म्हणजे जे साखरेचे तेच इंजिनांचे. ह्याचा अर्थ असा की परदेशात विक्री करताना भारतातील गिऱ्हाईक धंद्यांना 'सबसिडी' देत असते! परदेशी बाजारपेठ मिळविणे बरेच अवघड असते आणि ती मिळाल्यावर अनिश्चित असते, हे वेगळेच. इजिप्त–इस्राएल झगडयात किर्लोस्करांची वरीच मोठी ऑर्डर रद्द झाली हे नजीकचे उदाहरण. परदेशी बाजारपेठ मिळविणे हे उद्योगपतींच्या कर्तृत्वावर अवलंबून राहील. तेथे सरकारचा फारसा उपयोग नाही.

## धंद्यांस कर्जपुरवठा

निर्यातीस आणि येथील धंद्यांना उत्पादनासाठी आवश्यक असणाऱ्या मालाच्या आयातीस कमी व्याजाने पैसा मिळण्याची सोय होत आहे. रिझर्व-बँकेने आपला व्याजाचा दर सरसकट खाली न आणता काही धंद्यांसाठीच खाली आणावयाचे ठरविले आहे. इतर बँकाही ह्या कार्यक्रमाची कार्यवाही करतील. इंजिनिअरिंग धंद्यांना आणि शेतीशी संबंध असणाऱ्या धंद्यांनाही हा फायदा मिळेल.

मुंबईतील 'इकॉनॉमिक टाइम्स' हे पत्र समाजवादी असल्याचा कोणी आरोप करणार नाही. ह्या पत्राच्या ह्या विषयावरील एका अग्रलेखात पुढील निष्कर्ष काढला आहे :

"धंद्यांच्या संघटकांनी अशा भ्रमात राहू नये की सरकारच्या करविषयक आणि कर्जदानाविषयीच्या धोरणावर सर्व काही अवलंबून आहे. औद्योगिक विकासात करांना फार महत्त्व आहे – विशेषत: भांडवलसंचयाच्या बाबतीत. पण चालू मंदीच्या अरिष्टाच्या मुळाशी चुकीचे नियोजन आणि चुकीची भांडवल-गुंतवणूक हे कारण आहे. चुकीच्या भांडवलगुंतवणुकीमुळे धंद्यांच्या विविध क्षेत्रांमध्ये विषमतोल निर्माण झाले आहेत. काही भागात आजच्या आणि पुढे दिसणाऱ्या मागणीच्या मानाने वरीच अतिरिक्त अशी घोडदौड करणारी उत्पादन-शक्तीची वाढ झाली आहे. उलटपक्षी महत्त्वाच्या क्षेत्रात उत्पादनशक्ती अतिशय तोकडी पडते आहे आणि तेथील मागणी मारली जाते आहे. ह्यावरून सध्याच्या अरिष्टावरील उपाय असा दिसतो की हा उपाय कर-कर्जविषयक धोरणाच्या फेरविचारा-पेक्षा बराच पुढे गेला पाहिजे आणि त्यात धंद्यांच्या घडणीचा विचार आला पाहिजे."

## सरकारचा विकासकार्यक्रम

सरकारचा विकास कार्यक्रम चालू राहिला पाहिजे. त्या कार्यक्रमामुळे सर्व उद्योगधंद्यांना चालना मिळते आहे. 'कॉमर्स' हे साप्ताहिक म्हणते : "मंदी-संबंधी आमचे विश्लेषण बरोबर असेल तर स्पष्टपणे असे म्हटले पाहिजे की ज्यांनी सरकारी क्षेत्राच्या जलद विकासाला विरोध केला आणि त्यासाठी लागणाऱ्या करवाढीला विरोध केला ते सरकारचे टीकाकार अदूरदृष्टीचे होते." हेही साप्ताहिक समाजवादी नव्हे. तरीही हा निर्वाळा. उद्योगपतींनी मंदीच्या निमित्ताने फेरविचार करण्याची पाळी आली आहे हेच खरे.

## शेतीचे महत्त्व

सरकारने प्राय: शेतीच्या विकासाकडे लक्ष द्यावे. शेतीची वाढ हाच सर्वात मोठा भाववाढ रोखण्याचा उपाय, तसाच मंदीवरील महत्त्वाचा उपाय. हा उपाय कसा परिणामकारक होईल ते मागील विश्लेषणा-वरून लक्षात येईल.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. म. रं. शिरवाडकर

# अर्जुन आणि कृष्णाचे सारथ्य

कृष्णाच्या अलौकिक जीवनात त्याने अर्जुनाचे केलेले सारथ्य हे एक दिव्य पर्व आहे. कौरव-पांडवांचा कलह मिटविण्यासाठी कृष्णाने पराकाष्ठेचे प्रयत्न केले, पण दुर्योधनाच्या हटवादीपणामुळे ते सर्व प्रयत्न विफल ठरले. कौरवांच्या भाषेतच कौरवांना उत्तर दिल्याशिवाय हा कलहाग्नी शमणार नाही याची खात्री पटल्यावर "आता युद्ध झालेच पाहिजे" अशी कृष्णाने घोषणा केली. पांडवांचा विजय निश्चित करण्यासाठी त्याने अर्जुनाचे सारथ्य स्वीकारले. याचाच अर्थ पांडवांचा विजय होण्यासाठी स्वतः हातात शस्त्र घेण्यापेक्षा अर्जुनाचे सारथ्य करणे अधिक महत्त्वाचे आहे असे कृष्णाला वाटले हे उघड आहे. कृष्णाने हा निर्णय का घेतला ? स्वतः हातात शस्त्र घेऊन लढण्यापेक्षाही अर्जुनाचे सारथ्य स्वीकारणे कृष्णाला अधिक महत्वाचे का वाटले ? कृष्ण आणि अर्जुन हे जिवाभावाचे मित्र होते, पण या व्यक्तिगत कारणामुळे कृष्णाने उपरोक्त निर्णय घेतला असे म्हणता येणार नाही. कुशल धनुर्धराचा सारथीही वाकबगार असणे अवश्य होते, म्हणून कृष्णाने अर्जुनाचे सारथ्य स्वीकारले हा युक्तिवादही पटण्यासारखा नाही. त्या काळात किती तरी कुशल सारथी अर्जुनाला सहज मिळू शकले असते. केवळ अर्जुनाला कुशल सारथी हवा म्हणून आपण युद्धात प्रत्यक्ष भाग घेण्याऐवजी अर्जुनाचे सारथ्य स्वीकारावे ही कल्पना कृष्णाला कधीही ग्राह्य वाटली नसती.

पुष्कळांचा असा समज आहे की कृष्ण सारथी असल्यामुळेच अर्जुन अजिंक्य ठरला. पण ही समजूत अगदीच निराधार आहे. अर्जुनाच्या स्वयंसिद्ध आणि अनन्यसाधारण युद्धकौशल्याला कोणत्याही मदतीची –कृष्णाच्या सारथ्याचीही, तशी आवश्यकता नव्हती. भारतीय युद्धापूर्वीच याची प्रचीती सर्वांना आली होती. द्रौपदी–स्वयंवराच्या वेळी कर्ण, दुर्योधनप्रभृतींचा त्याने लीलया पराभव केला होता. कर्णाला पळवून लावणाऱ्या आणि दुर्योधनाला बंदिस्त करणाऱ्या चित्रसेन गंधर्वाचा पाडाव त्यानेच केला होता. गोहरणप्रसंगी कौरवपांडवांचे जे युद्ध झाले, त्यात भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा, कर्णप्रभृतींचे त्याने इतके वाभाडे काढले होते, की त्याची आठवण त्या वीरांना आमरण राहिली. हे पराक्रम अर्जुनाने गाजवले, त्यावेळी कृष्ण त्याचा सारथी नव्हता. भीष्म, द्रोण, कर्ण, सात्यकी, भीमप्रभृती योद्धे कितीही शूर असले, तरी अर्जुनाच्या पराक्रमापुढे त्यांचा पराक्रम अगदीच सामान्य वाटेल असा होता. युद्धात पराभव अर्जुनाला ठाऊक नव्हता. "पुष्कळ वीर अस्त्रविद्या जाणतात. ते कधी जिंकतात तर कधी हरतात; पण एक अर्जुन मात्र नेहमी विजयीच झाल्याचे दिसून येते." या थोड्या पण अत्यंत मार्मिक शब्दात धृतराष्ट्राने अर्जुनाच्या अनन्यसाधारण युद्धकौशल्यावर अचूकपणे बोट ठेवले आहे. अर्जुनाच्या युद्धकौशल्यात असा कोणताही उणेपणा नव्हता की तो झाकण्यासाठी त्याला कृष्णाच्या सारथ्याची अपेक्षा वा आवश्यकता होती. असे असूनही पांडवांना विजयी करण्यासाठी कृष्णाला अर्जुनाचे सारथ्य करणे आवश्यक वाटले, ते का हे जाणण्यासाठी अर्जुनाच्या विशिष्ट स्वभावरचनेचे परीक्षण करणे जरूर आहे.

कर्ण, युधिष्ठिर, भीम आणि अर्जुन या चार भावात स्वभावरचनेच्या दृष्टीने जसे पहिल्यात आणि तिसऱ्यात, तसे दुसऱ्यात आणि चौथ्यात विलक्षण साम्य आहे. उग्रता, औद्धत्य, डोळे दिपविणारा पराक्रम, त्या पराक्रमाचे प्रदर्शन करण्याची अनिवार हौस, अहंतेचे रूप घेणारा जबर आत्मविश्वास आणि कधीही न विझणारी वैराची भावना हे कर्ण आणि भीम यांचे ठळक स्वभावविशेष आहेत. या दोघांच्या स्वभावरचनेतील साधर्म्यासंबंधी मी पूर्वीच अन्यत्र[1] विवेचन केले आहे. अर्जुनाचे अनन्य युद्धकौशल्य सोडले तर युधिष्ठिर आणि अर्जुन यांच्या स्वभावरचनेतील साधर्म्यही चटकन लक्षात येण्यासारखे आहे. दोघानाही

१. "कर्ण आणि अर्जुन," नवभारत, सप्टेंबर १९६६.









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्वजनांशी कलह नको वाटतो आणि तो टाळण्यासाठी वेळप्रसंगी स्वतःकडे कमीपणा घ्यायला ते मागेपुढे पहात नाहीत. विचाराने अर्जुन युधिष्ठिराशी इतका एकरूप झाला होता की युधिष्ठिराच्या प्रत्येक कृतीचे समर्थन करायला तो तत्परतेने पुढे येई. पांडव वनवासात असताना जयद्रथ द्रौपदीला पळवून नेतो, त्यावेळी त्याने विचारल्यावरून द्रौपदी आपल्या पाची पतींचे स्वभावविशेष सांगते. अर्जुनाबद्दल बोलताना "हा माझा पति युधिष्ठिराचा भाऊ व शिष्य आहे," असे अतिशय मार्मिक उद्गार द्रौपदीने काढले आहेत. भीम, नकुल आणि सहदेव हे युधिष्ठिराचे भाऊ होते, पण अर्जुन हा युधिष्ठिराचा भाऊ आणि शिष्यही होता. युधिष्ठिराचे चुकत असेल किंवा युधिष्ठिर चुकू शकेल अशी कल्पनाच अर्जुनाच्या मनाला शिवू शकत नसे. युधिष्ठिर द्यूत का खेळला, याचे स्पष्टीकरण आणि समर्थन अर्जुनानेच केले. लाक्षागृहाच्या आपत्तीमधून बाहेर पडलेले पांडव रानावनात भ्रमण करीत असताना केवळ रात्रीच्या वेळी भागीरथीच्या तीरावर आले एवढ्या कारणावरून गंधर्वराज अंगारपर्णाने पांडवांवर हल्ला केला, तेव्हा त्याचा लीलया पराभव करून, "आज हा कुरुराज युधिष्ठिर तुला अभय देत आहे" असे म्हणून अर्जुनाने त्याला जीवदान दिले. अर्जुनाचे सारे पराक्रम युधिष्ठिरासाठीच होते. "तुझ्या कल्याणासाठीच माझे जीवन आहे" असे तो युधिष्ठिराला सांगतो आणि अशीच त्याची भावना होती. तो अतिशय शूर असला तरी आपले शौर्य स्वजनांचा घात करण्यासाठी खर्ची पडू नये अशी आत्यंतिक तळमळ त्याला वाटत असते. या बाबतीत त्याचा आणि युधिष्ठिराचा दृष्टिकोन सारखाच होता. फरक इतकाच की युधिष्ठिराचा हा दृष्टिकोन विचारशीलतेवर, तर अर्जुनाचा बव्हंशी भावनेवर आधारलेला होता. भर सभेत द्रौपदीची विटंबना झाल्यावर भीमाने दुर्योधन आणि दुःशासन यांच्या वधाची, तर अर्जुनाने कर्णवधाची प्रतिज्ञा केली. या प्रतिज्ञांमधील फरक बघणे मनोरंजक होईल.

"युद्धात या पापी दुर्बुद्धी भारतकुलकलंक दुःशासनाचे वक्षःस्थल पराक्रमाने फोडून त्याचे रक्त जर मी न प्यालो, तर मला माझ्या पूर्वजांची सद्गती प्राप्त होणार नाही!" ही भीमाची प्रतिज्ञा.

"हे नीच दुर्योधना, ही तुझी मांडी युद्धात मी जर न फोडली, तर मी आपल्या पितरांसह थोर पितृलोकास जाणार नाही," ही त्याची दुसरी प्रतिज्ञा. आणि अर्जुनाची प्रतिज्ञा? प्रतिज्ञा करण्याचीच अर्जुनाने प्रथम टाळाटाळ केली. पण शेवटी कर्णवधाची जी प्रतिज्ञा त्याने केली ती अशी आहे.

"कर्ण, त्याचे अनुयायी आणि मोहाने प्रतिपक्षाला मिळून माझ्यासमोर उभे राहणारे राजे, या सर्वांचा मी माझ्या तीक्ष्ण बाणांनी वध करीन. आजपासून चौदाव्या वर्षी दुर्योधनाने आमचे राज्य सत्कारपूर्वक आम्हाला परत न दिले, तर मी माझ्या बाणांनी कर्णादि वीरांना यमसदनी पाठवीन. माझी ही प्रतिज्ञा कधीहि खोटी होणार नाही."

भीमाची प्रतिज्ञा (पहिली वा दुसरी) म्हणजे आपल्या गर्जनेने सारे आकाश निनादवून टाकीत सळसळणारी वीज वाटते. त्या प्रतिज्ञेच्या उच्चाराने सर्व सभेचा थरकाप झाल्याशिवाय राहिला नसेल. दुर्योधन-दुःशासनही काही काळ सुन्न व्हावेत अशी धार, अशी तीव्रता, असा जोष, त्या प्रतिज्ञांमध्ये होता. अर्जुनाची प्रतिज्ञा इतकी सौम्य होती, की तिला खऱ्या अर्थाने प्रतिज्ञा का म्हणावे हे समजणे कठीण आहे. कर्णाचा वध करीन हे सांगण्यापेक्षा, निदान चौदा वर्षांनी तरी हा अंतस्थ कलह मिटू द्या हे सांगण्यासाठीच अर्जुनाच्या या प्रतिज्ञेचा जन्म झालेला दिसतो!

पण या दीर्घकालानन्तरही दुर्योधनाचे हृदयपरिवर्तन झाले नाही. अखेरचा प्रयत्न म्हणून स्वतः कृष्ण सलोखा घडवून आणण्यासाठी कौरवांकडे जायला निघाला. त्यावेळी त्याला निरोप देताना, अर्जुन जे काय बोलला, त्यात त्याच्या भांबावलेल्या मनःस्थितीचे हृद्य दर्शन होते. "तुला कौरवांशी सलोखा करणे असाध्य नाही" अशी दृढ आशा प्रथम त्याने प्रगट केली, पण लगेच "कौरवांना केवळ युद्धानेच जिंकणे शक्य आहे" असे मत त्याने व्यक्त केले. पण पुन्हा "ज्यामुळे शत्रूंशी सलोखा होईल असेच तू वर्तन कर" असेही कृष्णाला त्याने सुचवले आहे आणि शेवटी "तू कौरवांशी सलोखा कर किंवा तुझ्या इच्छेस येईल तसे कर" असे म्हणून तो मोकळा झाला! स्वजनांशी कलह उपस्थित झाला म्हणजे थोर मनाची अशी अवस्था होणे अपरिहार्य आहे. पण अर्जुन केवळ थोर





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नव्हता, तो अतिशय भावनाप्रधानही होता. त्यामुळे विषादाचे ढग त्याचे मन हाहा म्हणता व्यापून टाकीत.

कृष्णशिष्टाई विफल झाली आणि कौरव–पांडवांचे युद्ध अटळ ठरले. अर्जुनाला वगळून कौरव–पांडवांच्या बलाबलाचा विचार केला तर काय दिसून येते? पांडवांचा सेनापती धृष्टद्युम्न हा होता. द्रौपदीचा भाऊ असल्यामुळेच बहुधा हा मान त्याला मिळाला असावा. त्याने मिळविलेल्या विजयांपेक्षा त्याचे पराभवच लक्ष वेधून घेतात. पांडवांची खरी भिस्त सात्यकी, भीम, घटोत्कच आणि अभिमन्यु यांच्यावर होती. अर्जुन आणि कदाचित् कर्ण सोडला, तर सात्यकीच्या तोडीचा दुसरा धनुर्धर दुसरा कोणीही नव्हता. गदायुद्धात आणि बाहुबलात भीमाचा हात धरणारे वीर फारच थोडे होते. भीमाप्रमाणे त्याचा मुलगा घटोत्कच हाही पराक्रमी होता. अभिमन्यु पराक्रमी असला तरी युद्धाचा त्याला फारसा अनुभव नव्हता. कौरवपक्षात भीष्म आणि द्रोणाचार्य हे मोठ्या कीर्तीचे योद्धे होते. त्यांच्या नावाचा दबदबा मोठा असला तरी वृद्धत्वामुळे त्यांच्या पराक्रमाला आपोआपच मर्यादा पडल्या होत्या. कर्ण, अश्वत्थामा, जयद्रथ, कृपाचार्य, कृतवर्मा, भगदत्त अलायुध आणि दुर्योधन-दुःशासन हे कौरवांचे खरे आधारस्तंभ होते. अर्जुनाला वगळून विचार करता कौरवांचे बळ पांडवांच्या बळापेक्षा निःसंशय श्रेष्ठ होते. किंबहुना, अर्जुन नसताना कौरवांपुढे पांडवांचे बळ कसे तोकडे पडते याची खेदजनक प्रचीती पांडवांना लौकरच यायची होती. अर्जुनाचे युद्ध-कौशल्य इतके असाधारण होते, की केवळ त्याच्यामुळे पांडवांचा विजय विचारवन्तांना निश्चित वाटत होता. कौरवपक्षातला कोणताही योद्धा अर्जुनापुढे उभा राहू शकत नाही याची सर्वांना अनुभवाने खात्री पटली होती. पण आता निर्णायक, मरू किंवा मारू या जिद्दीने युद्ध व्हायचे होते. अर्जुनाचे युद्धकौशल्य जसे अनन्य होते, तशी भावनावश होण्याची त्याची प्रवृत्तिही प्रबळ होती. जे युद्धकौशल्य परकीय शत्रूपुढे धगधगत्या भास्कराप्रमाणे अपार तेजाने तळपले असते, ते युद्धकौशल्य स्वकीय शत्रूपुढे भावनावशते-मुळे म्लान होण्याची भीती होती. पांडवांना खरा धोका होता, तो अर्जुनाच्या या भावनावशतेपासून. युद्धशील अर्जुनाच्या भावनांना आवर घालणे, त्यांचे नियंत्रण करणे जरूर होते आणि हे कार्य सामान्य माणसाचे नव्हते, कारण अर्जुनाच्या युद्धकौशल्या-प्रमाणे त्याची भावनाशीलताही अमर्याद होती. स्वतः शस्त्र घेऊन लढण्याऐवजी कृष्णाने अर्जुनाचे सारथ्य करण्याचे ठरवले ते एवढ्यासाठीच. अर्जुनाच्या रथाच्या अश्वांचे नियंत्रण करण्यापेक्षाही, त्याच्या भावनाप्रधान मनाचे नियंत्रण करणे अधिक महत्वाचे होते. सारथी होऊन कृष्णाने आपले संजीवक सान्निध्य अर्जुनाला दिले. कृष्णाचा हा निर्णय किती योग्य होता याची प्रचीति भारतीय युद्धात वारंवार येत राहिली. शत्रू म्हणून आपल्यासमोर आपलेच लोक उभे राहिलेले पाहून युद्धापूर्वी अर्जुनाचे मन विषादाने कसे झाकळून गेले आणि कृष्णाने त्याची समजूत कशी घातली हा प्रसंग सर्वांना ठाऊक आहे. अर्जुनाच्या विषादामुळे गीतेचा जन्म झाला. गीताश्रवणामुळे "माझा मोह आता नष्ट झाला आहे" अशी कृष्णाला ग्वाही देऊन, अर्जुन युद्धार्थ सिद्ध झाला. पण अर्जुनाचा मोह खरोखरच संपूर्णपणे नष्ट झाला होता काय?

भीष्म कौरवांचा सेनापती झाला आणि कौरवपांड-वांच्या युद्धाला तोंड लागले. पहिल्या दिवशी अर्जुनाचे मन युद्धात मुळीच नव्हते. रात्री शिबिरात आल्यावर युधिष्ठिराने कृष्णाजवळ तक्रार केली की, "अर्जुन रणांगणात एखाद्या तटस्थ माणसाप्रमाणे वागत आहे. भीमच काय तो खरे युद्ध करीत आहे." विषादाच्या वर्तुळामधून अर्जुन युद्धाच्या पहिल्या दिवशी तरी बाहेर पडला नव्हता हे यावरून स्पष्ट दिसते. दुसऱ्या दिवशी मात्र अर्जुनाने मोठा पराक्रम गाजविला आणि "याला समरात जिंकणे कोणालाही शक्य नाही" अशी कबुली भीष्माला द्यावी लागली. भीष्म सेनापती असताना दहा दिवस जे युद्ध झाले त्यात दुर्योधनाचा अपेक्षाभंग व्हावा अशाच घटना घडत गेल्या. अर्जुन, भीम, घटोत्कच आणि अभिमन्यु यांच्या पराक्रमामुळे कौरवांची धूळधाण झाली. रणांगणावर कर्ण नसल्यामुळे कौरवांची बाजू लंगडी पडल्यासारखी झाली. भगदत्त आणि भूरिश्रवा हेच कौरवांकडील वीर काय ते लक्षणीय पराक्रम गाजवू शकले. अर्जुनाच्या चौफेर माऱ्यामुळे कौरवांची अपार हानी झाली. पण या धुमचक्रीत



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अर्जुनाचा मुलगा इरावानही ठार झाला आणि अर्जुनाचे भावनाप्रधान मन विषादाने भरून आले. " निदान पाच गावे तरी आम्हाला दे ही युधिष्ठिराची मागणी किती योग्य होती हे आता मला पटते आहे. पण तरीही दुर्योधनाने आमच्याशी सलोखा केला नाही. ठार झालेल्या क्षत्रियांना पाहून मला माझीच चीड येते! या क्षत्रिय जीवनाला धिःकार असो! स्वजनांशी युद्ध करणे मला मुळीच मान्य नाही, पण रणांगणात जमलेले हे क्षत्रिय मला दुर्बळ समजतील, म्हणून मी युद्धाला उभा राहिलो आहे " असा शोक तो करू लागला. अर्जुन शोक करीत असला तरी निदान 'मी युद्ध करणार नाही ' असे तो म्हणत नसल्याने कृष्णाने काहीच न बोलता रथ वेगाने पुढे नेला. खुद्द भीष्माशी जेव्हा अर्जुनाची गाठ पडली, तेव्हा त्याची झालेली विमनस्क स्थिती सर्वांच्या नजरेस आली. भीम, नकुल, सहदेव, अभिमन्युप्रभृती पांडववीर जेव्हा भीष्माच्या शरजालाने जर्जर झाले, तेव्हा एकट्या अर्जुनानेच त्या सर्वांना संकटातून बाहेर काढले. भीष्मापेक्षा तो नेहमीच वरचढ ठरला, पण भीष्माशी निकराने युद्ध करायला त्याच्या मनाची तयारी होईना. केवळ उपदेशाने आता काम भागणार नाही हे ओळखून कृष्णाने भीष्मावर धावून जाण्याचा दोनदा आविर्भाव केला. " तुझ्या ढिलाईमुळे मला माझ्या प्रतिज्ञेचा सुद्धा भंग करावा लागत आहे " असेच त्याला अर्जुनाला सुचवावयाचे होते. कृष्णाच्या या कृतीचा अर्थ न समजण्याइतका अर्जुन अर्थातच खुळा नव्हता. कृष्णाला त्याने दोन्ही वेळा मागे ओढले आणि आपण निकराने युद्ध करू असेही आश्वासन त्याने कृष्णाला दिले. वृद्धत्वामुळे भीष्माच्या हातूनही विशेष असे काही घडत नव्हते. त्यामुळे कौरवांच्या कल्याणासाठी भीष्माला शस्त्रत्याग करायला लावावा अशी सूचना करायलाही कर्णाने मागेपुढे पाहिले नाही. ही सूचना जेव्हा दुर्योधनाने भीष्मापुढे ठेवली. तेव्हा, " तुला जेव्हा गंधर्वांनी पराभूत करून बांधून नेले, तेव्हा तुझे सर्व भाऊ आणि कर्ण पळून गेले. अर्जुनानेच तुला त्यांच्या हातून सोडवले. गोग्रहणप्रसंगी एकटा अर्जुन आपणा सर्वांवर चालून आला. मी, द्रोणाचार्य, कृपाचार्य, कर्ण, अश्वत्थामा या सर्वांचा त्याने पराभव केला. अर्जुनाला युद्धात जिंकण्यास कोणीही समर्थ नाही," अशी स्पष्टोक्ति भीष्माने दुर्योधनाला ऐकवली. भीष्माचे हे म्हणणे खरे होते, पण अर्जुन भीष्माशी निकराने युद्ध करायची टाळाटाळ करीत होता हेही खरे होते. त्यामुळे युद्ध अकारण रेंगाळत चालले होते. गोष्टी निकराला आल्या आणि सर्वांनी अर्जुनाला आपल्या कर्तव्याची जाणीव करून दिली. शिखंडीला निमित्त करून अर्जुनाने भीष्माचा वध करावा असे सुचविण्यात आले. इतका वेळ बंदिस्त झालेल्या अर्जुनाच्या भावना उफाळून उठल्या आणि भावनावश होऊन तो पुन्हा मूळपदावर आला. " हे कृष्णा " अर्जुन म्हणाला, " भीष्म आमचा गुरु आहे. त्या पितामहाशी मी कसे युद्ध करू? मी लहानपणी खेळत असताना धुळीने माखलेल्या अंगाने भीष्माच्या मांडीवर लोळून त्याचे अंग मळवीत असे, पण तो माझ्यावर कधीही रागावला नाही. मी जेव्हा त्याला ' तात, तात ' म्हणून हाक मारी, तेव्हा " बाळा, मी तुझा ' तात ' नाही– तुझ्या वडिलांचा ' तात " आहे " असे मला तो सांगे. अशा पितामहाचा वध मी कसा करू? माझ्या सैन्याचा वध, संहार झाला तरी मी त्याच्याशी युद्ध करणार नाही, मग माझा वध होवो वा जय होवो! " गीताश्रवणापूर्वी अर्जुनाला झालेला विषाद आणि हा विषाद यात तिळमात्र फरक नाही. स्वजनांशी युद्ध करण्याचा प्रसंग निर्माण झाल्यामुळे अर्जुनासारख्या भावनाप्रधान माणसाचा विषाद कोणत्याही उपायाने संपूर्णपणे नष्ट होण्यासारखा नव्हता. यावेळी युद्धाची धुमश्चक्री प्रत्यक्ष चालू असल्याने तर्कवादाने अर्जुनाचा विषाद घालविण्याचा कृष्णाने प्रयत्न केला नाही. भीष्मवध झालाच पाहिजे एवढेच त्याने अर्जुनाला निक्षून सांगितले. अर्जुनाने अखेर निकराचे युद्ध केले, पण भीष्मवधाची जबाबदारी आपल्या डोक्यावर येऊ नये अशी अखेरपर्यंत त्याची आत्यंतिक इच्छा होती. शिखंडीला पुढे करून अर्जुनाने भीष्मावर शरवृष्टी करावी हा प्रस्ताव त्याने एवढ्यासाठीच स्वीकारलेला दिसतो. असे केल्याने भीष्मवध शिखंडीने केल्यासारखे होईल असे त्याला वाटले असावे! प्रत्यक्षात शिखंडीला पुढे केले म्हणून भीष्माने अर्जुनावर शरवृष्टी करण्याचे सोडले नाही किंवा शिखंडीच्या शरसंधानामुळे भीष्माला फारसा उपसर्ग




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पोचला असेही नाही. अर्जुनाच्या तीक्ष्ण बाणामुळेच शेवटी भीष्माचे पतन झाले हे उघड आहे.

भीष्मपतनानन्तर द्रोणाचार्य कौरवांचे सेनापती झाले. दहा दिवस युद्धात सहभागी न झालेला कर्णही युद्धाला सज्ज झाला आणि त्यामुळे कौरवांच्या पक्षात उत्साहाचे नवे वारे खेळू लागले. द्रोणाचार्य कौरवांचे पाच दिवस सेनापती होते आणि या पाच दिवसातच कौरव-पांडवांचे निर्णायक युद्ध झाले असे म्हणता येईल. इतके व्यापक आणि घनघोर युद्ध त्यापूर्वी किंवा त्यानंतर झाले नाही. द्रोणवधानंतरच कर्ण, दुःशासन, दुर्योधन प्रभृतींचा वध झाला हे खरे असले, तरी कौरवपांडवांची खरी लढत या पाच दिवसातच झाली. या काळात अर्जुन आणि सात्यकी यानी गाजवलेला पराक्रम वर्णनातीत होता. याच पाच दिवसात अतुल पराक्रम गाजवून भगदत्त, अभिमन्यु, जयद्रथ, घटोत्कच आणि अलायुध मृत्यु-मुखी पडले. याच पाच दिवसात कर्ण आणि भीम यांची रोमांचकारी युद्धे झाली. खुद्द द्रोणाचार्यांचे कर्तृत्व या अवधीत फारसे दृष्टोत्पत्तीस येत नसले, तरी कौरव-पक्षाचे क्षात्रतेज याच पाच दिवसात प्रकर्षाने प्रगट झाले. आणि मुख्य म्हणजे अर्जुनाच्या अनुपस्थितीत आपले बळ कौरवांपुढे कसे तोकडे पडते याची खेदजनक प्रचीति पांडवांना याच कालात आली. अर्जुनाच्या विषादाने या पाच दिवसातही अर्जुनाची सोबत केली.

द्रोणाचार्य सेनापती होऊनही कौरवांचा पांडवांपुढे प्रभाव पडत नाही हे पाहून दुर्योधन खिन्न झाला. भीमासारख्या पराक्रमी वीरालाही जर्जर करणाऱ्या भगदत्ताला अर्जुनाने ठार केल्यामुळे तर तो अगदीच निराश झाला आणि आपली निराशा त्याने आचार्यां-जवळ व्यक्त केली. जोपर्यंत अर्जुन पांडवपक्षाचे रक्षण करीत आहे, तोपर्यंत आपण काहीच करू शकत नाही, पण मुख्य सैन्यापासून अर्जुनाला काही काळ अलग करणे शक्य झाल्यास, पांडवांना आपण चांगलीच अद्दल घडवून आणू असा विश्वास आचार्यांनी त्यावर व्यक्त केला. दुर्योधनाने ही सूचना दुसऱ्या दिवशी ताबडतोब अमलात आणली आणि भारतीय युद्धातील एका घनघोर संग्रामाला प्रारंभ झाला. प्रथम संशप्तकांनी अर्जुनाला दक्षिणेकडे युद्धाचे आव्हान केले आणि त्यामुळे अर्जुनाचा आणि मुख्य सैन्याचा संबंध पूर्णपणे तुटला. तत्काळ द्रोणाचार्यांनी आपल्या सैन्याची चक्र-व्यूहाकार रचना केली. कृष्ण ढगांची झुंड ज्याप्रमाणे आकाशाला आक्रमित पुढे दौड करते, त्याप्रमाणे तो प्रचंड चक्रव्यूह पांडवाच्या सैन्याचा फडशा पाडीत पुढे येऊ लागला. चक्रव्यूहात शिरून त्याचा धुव्वा उडवणे हाच त्यावर एक मार्ग होता. पण असे दुष्कर कर्म करू शकणारा अर्जुन आता मुख्य रणांगणावर उपस्थित नव्हता; किंबहुना तो नसल्यामुळेच हा व्यूह रचण्यात आला होता. कसेही करून चक्रव्यूहात शिरून त्याचा धुव्वा उडविण्याचा प्रयत्न करणे किंवा स्वतःचा सर्व-विनाश ओढवून घेणे हे दोनच पर्याय शिल्लक असल्या-मुळे, पूर्वोक्त पर्यायाचा अवलंब करण्याशिवाय पांडवांना दुसरे गत्यंतरच नव्हते. चक्रव्यूहाचा भेद कसा करायचा हे अभिमन्यूलाही ठाऊक असल्यामुळे सर्वांच्या नजरा साहजिकच त्याच्याकडे वळल्या. ही जोखीम अंगावर घ्यायला अभिमन्यु प्रथम तरी फारसा उत्सुक होता असे दिसत नाही. " मी व्यूहात प्रवेश करीन, पण आत गेल्यानन्तर काही संकट ओढवल्यास मला बाहेर पडता येईल की नाही याची शंका वाटते", ही आपली अडचण प्रांजलपणे त्याने सर्वांपुढे मांडली. अभिमन्यूने उल्लेखिलेले संकट काय होते ? चक्रव्यूहात एकाकी पडण्याचा संभव हेच ते संकट होते. पण असे संकट ओढवणार नाही, याची योग्य ती खबरदारी आपण घेऊ असे युधिष्ठिर, भीमप्रभृतींनी अभिमन्यूला आश्वासन दिले. " तू व्यूहाचा भेद कर–तुझ्या पाठोपाठ आम्ही आत प्रवेश करू आणि चक्रव्यूहाचा धुव्वा उडवू " अशी खातरजमा भीमाने अभिमन्यूला दिली. हे साहस न करण्याबद्दल अभिमन्यूच्या सारथ्याने अभिमन्यूची मनधरणी केली, पण चुलत्याची आज्ञा शिरसावंद्य मानून अभिमन्यु हे दुष्कर कर्म करायला उत्साहाने सिद्ध झाला.

अभिमन्यूने चक्रव्यूहाचा भेद करावा आणि त्याच्या पाठोपाठ युधिष्ठिर, भीम, सात्यकी, धृष्टद्युम्न-प्रभृतींनी आत शिरावे अशी ही योजना होती. चक्रव्यूहाचा भेद करून आणि सर्व विरोध निपटून काढून अभिमन्यु विजेच्या चपळाईने आत शिरला. आपल्यावर सोपवलेले कार्य त्याने मोठ्या धडाडीने









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पूर्ण केले. योजनेचा पूर्वभाग पुरा झाला, पण उत्तरभाग ? युधिष्ठिर, भीम, सात्यकी प्रभृती योद्धे अभिमन्यूच्या पाठोपाठ जाण्याचा प्रयत्न करू लागले, पण एकट्या जयद्रथाने त्या सर्वांना मागे पिटाळून लावले. प्रचंड लाटांचा दिमाख एखाद्या पोलादी खडकापुढे लुप्त व्हावा त्याप्रमाणे युधिष्ठिर, भीम, सात्यकी, धृष्टद्युम्न वगैरे वीरांचे सारे शौर्य जयद्रथापुढे निष्फळ ठरले. जयद्रथाच्या अस्त्रनैपुण्यामुळे पांडव-वीरांना एक पाऊल पुढे टाकणेही अशक्य झाले. परिणामतः चक्रव्यूहात शिरलेला अभिमन्यु एकाकी पडला आणि ज्या संभाव्य संकटाचा त्याने उल्लेख केला होता, ते संकट त्याच्यापुढे प्रत्यक्ष उभे राहिले. द्रोणाचार्य, कर्ण, कृपाचार्य, अश्वत्थामा, शल्य, दुर्योधन, दुःशासनप्रभृतींनी त्याला गराडा घातला. क्रुद्ध वाघांच्या तावडीत सापडलेल्या सिंहाच्या छाव्याप्रमाणे अभिमन्यूची स्थिती झाली. जिवावर उदार झालेला अभिमन्यु अपूर्व शौर्याने लढू लागला आणि कौरववीरांची त्याने त्रेधा उडवून दिली. त्याने प्रथम दुर्योधनावर हल्ला करून त्याची गाळण उडवली. शल्याला मूर्च्छित करून, शल्याच्या भावाला त्याने ठार केले. आपल्यावर धावून आलेल्या दुःशासनालाही त्याने विव्हल केले. दुःशासनाची विकल अवस्था पाहून कर्णाने अभिमन्यूवर हल्ला केला, पण अभिमन्यूने कर्णाचीही इतकी शोचनीय अवस्था करून टाकली, की कर्णाचा धाकटा भाऊ कर्णाच्या मदतीसाठी धावून आला. बेभान झालेल्या अभिमन्यूने कर्णाच्या भावाचे मस्तक क्षणात धडावेगळे केले. आपल्याला वाचविण्यासाठी आलेला आपला भाऊ प्राणाला मुकला हे पाहून तरी कर्णाने निर्धाराने युद्ध करायला हवे होते. पण ते करण्याऐवजी तो तेथून पळून गेला. शल्याचा मुलगा रुक्मरथ, दुर्योधनाचा मुलगा लक्ष्मण यांनाही अभिमन्यूने ठार केले. सर्वांनी संघटित होऊन प्रयत्न केल्याशिवाय अभिमन्यूचा काटा काढता येणार नाही हे जाणून द्रोण, कृप, कर्ण, अश्वत्थामा, शल्य व भोज या सहा जणानी नंतर अभिमन्यूवर एकदम हल्ला केला. कर्णाने अभिमन्यूचे धनुष्य तोडून टाकले, भोजाने त्याचे घोडे ठार केले आणि कृपाचार्यांने त्याच्या सारथ्याचा वध केला. अभिमन्यूवर काही जणांनी पुढून तर कर्णाने मागून शरवृष्टी चालवली. विरथ झालेल्या अभिमन्यूने शेवटी गदा हातात घेतली आणि गदायुद्धातही विक्रम गाजवून तो अखेर दुःशासनाच्या पुत्राकडून ठार झाला.

अर्जुनाच्या अनुपस्थितीत जयद्रथ आणि अभिमन्यु यांनी जो पराक्रम गाजवला, तो भारतीय युद्धात ठळक उठून दिसण्याइतका तेजस्वी आहे. अभिमन्यूचा पराक्रम मोठा होता, पण जयद्रथाचाही कमी नव्हता हे लक्षात ठेवणे जरूर आहे. कौरववीरांची जी अवस्था अभिमन्यूने केली, तीच स्थिती जयद्रथाने पांडववीरांची केली. सात्यकीसारखा धनुर्धरही जयद्रथापुढे हतबल झाला यावरून जयद्रथाने त्यावेळी केवढे मोठे शौर्य गाजवले याची कल्पना येईल. अर्जुनाच्या अनुपस्थितीत पांडवांचे शौर्य कितपत प्रभावी ठरते याची ही एका परीने परीक्षाच होती. त्या परीक्षेत पांडव उत्तीर्ण होऊ शकले नाहीत हे नाकारण्यात अर्थ नाही. अर्जुनाचा पराक्रम हाच पांडवांचा खरा आधार होता आणि हा आधार भावनावशतेमधून उगम पावणाऱ्या विषादामुळे डळमळू नये याची तजवीज करणे हे पांडवांच्या विजयाच्या दृष्टीने सर्वात मोठे कार्य होते. अर्जुनाचे सारथ्य स्वीकारून, सदैव त्याच्याजवळ राहून कृष्णाने हे कार्य आपल्या अंगावर घेतले आणि मोठ्या कौशल्याने ते पार पाडले. पांडवाचा विजय निश्चित झाला तो त्यामुळेच.

अभिमन्यूच्या वधामुळे अर्जुनावर दुःखाचा डोंगर कोसळल्यासारखे झाले. दुसऱ्या दिवशी सूर्यास्त होण्याच्या आत जयद्रथाचा वध करण्याची त्याने प्रतिज्ञा केली. तथापि ह्या प्रतिज्ञेचे स्वरूपही अर्जुनाच्या स्वभावरचनेवर झगझगीत प्रकाश टाकते. ही प्रतिज्ञा करताना अर्जुनाने अशीही पुस्ती जोडली की, “ स्ववधाच्या भयाने जयद्रथ कौरवांना सोडून गेला नाही, तर मी त्याचा उद्या निश्चित वध करीन. युधिष्ठिराला, कृष्णाला किंवा आम्हाला तो जर शरण न आला तर उद्या त्याचा वध निश्चित आहे. ” म्हणजे पोटतिडिकीने केलेल्या या प्रतिज्ञेतही जयद्रथाला पुष्कळ पळवाटा उपलब्ध करून ठेवल्या होत्या ! अर्जुनाचे आंतरिक सौजन्य इतके मोठे होते की स्वजनांशी चाललेल्या युद्धात निकराची भाषा तो बोलूच शकत नसे. महान पराक्रम गाजवणारा जयद्रथ अर्जुनाच्या प्रतिज्ञेमुळे विकलगात्र झाला आणि स्वगृही जाण्याच्या








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गोष्टी करू लागला यावरूनही अर्जुनाच्या पराक्रमाची जरब किती विलक्षण होती हे स्पष्ट होते. तथापि ' मी असा व्यूह रचीन की अर्जुनाचे काही चालणार नाही ' असे द्रोणाचार्यांनी अभिवचन दिल्यामुळे जयद्रथाने स्वगृही जाण्याचा आपला बेत बदलला. असे आश्वासन देण्यापूर्वी द्रोणाचार्यांनी स्वतःच्या सामर्थ्याचा विचार केला होता असे दिसत नाही आणि एकदा आश्वासन दिल्यावर ते पाळण्याची कोशीसही त्यानी केली नाही. प्रत्यक्षात जेव्हा द्रोणाला बाजूस सारून अर्जुन जयद्रथाच्या रोखाने पुढे जाऊ लागला तेव्हा "वृद्धत्वामुळे माझ्याच्याने वेगाने जाववत नाही. तूच अर्जुनाशी युद्ध कर" असे दुर्योधनाला सांगून आचार्यांनी वेळ मारून नेली! याचा अर्थ असा नव्हे की द्रोणाचार्य जाणूनबुजून लढण्यात कुचराई करीत होते. "द्रोणाचार्य आता वृद्ध झाले आहेत. चापल्याने युद्ध करण्यास ते आता असमर्थ झाले आहेत, त्यामुळे अर्जुन त्यांचे उल्लंघन करून गेला. त्यात द्रोणाचा काही दोष आहे असे मला वाटत नाही" हे कर्णाने केलेले निदानच अचूक आहे. तरीही दिलेले आश्वासन पाळण्याचा आचार्यांनी अधिक निकराने प्रयत्न करायला हवा होता असे वाटल्याबाचून राहत नाही.

जयद्रथाचे अर्जुनापासून रक्षण करण्यासाठी द्रोणाचार्यांनी प्रचंड व्यूह रचला. त्या व्यूहाच्या पार्श्वभागात आणखी एक व्यूह रचून त्याच्या मुखापाशी ते स्वतः उभे राहिले. द्रोणाचार्यांपासून बारा मैल मागे जयद्रथाचा तळ होता आणि त्याचे रक्षण करण्याची कामगिरी कर्ण, अश्वत्थामा, कृपाचार्य, शल्यवगैरेंवर सोपविण्यात आली होती. व्यूहाच्या अग्रभागी दुःशासन, दुर्मर्षणप्रभृती कौरववीर उभे राहिले होते. सूर्यास्तापर्यंत अर्जुनाला जयद्रथापर्यंत पोचू न देण्याचा कौरवांचा आणि सूर्यास्त होण्याच्या आत जयद्रथाचा वध करण्याचा अर्जुनाचा निर्धार होता. अर्जुनाने व्यूह फोडला. आणि अघाडीवरील कौरवांना पळवून लावून तो द्रोणाचार्यांपाशी आला. द्रोणाचार्यांना बाजूला टाकून अर्जुन पुढे गेला आणि वर सांगितल्याप्रमाणे, वृद्धत्वामुळे द्रोणाचार्य अर्जुनाची दौड थांबविण्यासाठी काहीच करू शकले नाहीत. मार्गावरील सर्व विरोधकांचा फडशा उडवून अर्जुन संध्याकाळच्या सुमारास जयद्रथापाशी आला. त्यावेळी कर्ण, अश्वत्थामा, कृपाचार्य शल्यप्रभृतींनी जयद्रथाचे रक्षण करण्याचा जिवापाड प्रयत्न केला, पण त्या सर्वांचा पराभव करून अखेर अर्जुनाने सूर्यास्त होण्याच्या आत जयद्रथाचे शिर उडविले.

कृष्णाने सुदर्शनचक्राने सूर्याला झाकून सूर्यास्त झाल्याचा भास निर्माण केला, त्या भासामुळे लपून बसलेला जयद्रथ पुढे आला आणि तो पुढे आल्याचे पाहून "हा सूर्य, हा जयद्रथ" असे कृष्णाने म्हणताच अर्जुनाने जयद्रथाचा शिरच्छेद केला, या कल्पनारम्य कथेला ' महाभारता'त मुळीच स्थान नाही. तथापि, ' महाभारता'तील सरळसरळ वृत्तांतातही कल्पनारम्यतेने थोड्या प्रमाणात प्रवेश केला असल्याने, ती कल्पनारम्यता जयद्रथवधाच्या अन्यथा सरळ आणि सुसंगत असलेल्या वृत्तांताशी कितपत मिळतीजुळती आहे हे पाहिले पाहिजे.

हा कल्पनारम्य भाग खालीलप्रमाणे आहे.

सूर्यास्त होण्याची वेळ आल्यामुळे "मी सूर्याला आच्छादित करण्याची उपाययोजना करतो. त्यामुळे सूर्यास्त झाला असे जयद्रथाला वाटेल आणि तो लपून बसणार नाही. तो तुला मारायला पुढे येईल. ही संधी साधून तू त्याचा वध कर" असे कृष्णाने अर्जुनाला सांगितले. योगसामर्थ्याच्या जोरावर कृष्णाने गाढ अंधकार निर्माण केला आणि त्यामुळे सूर्यास्त झाला असे वाटू लागले. काळोख झाल्याचे पाहून कौरवयोद्धे आनंदित झाले आणि जयद्रथही वर पाहू लागला, पण त्याला सूर्य दिसला नाही. कृष्णाने तत्काळ जयद्रथाचा वध करण्याबद्दल अर्जुनाला सुचविले. पण कर्ण, अश्वत्थामाप्रभृति योद्धे जयद्रथाचे रक्षण करीत असल्यामुळे अर्जुनाला त्यांच्याशी प्रथम युद्ध करावे लागले. घोर संग्राम होऊन अर्जुनाने त्या सर्वांना पळवून लावले आणि जयद्रथ एकाकी पडला. "सूर्य अस्तंगत होत आहे, पहा. त्याचा सत्वर वध कर" असे कृष्णाने म्हणताच अर्जुनाने जयद्रथाचे शिर उडविले. जयद्रथाचा वध झाल्यानंतर कृष्णाने अंधकाराचाही नाश केला. थोड्याच वेळापूर्वी पसरलेला काळोख म्हणजे कृष्णाची माया होती हे मागाहून सर्वांच्या लक्षात आले.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## अर्जुन आणि कृष्णाचे सारथ्य

वरील वृत्तांतात योगमायेने सूर्यास्त झाल्याचा कृष्णाने भास निर्माण केल्याचे म्हटले आहे. पण युद्ध चालू असताना सूर्यास्त झाल्याचा कौरवांचा किंवा जयद्रथाचा समज झाला होता असे दर्शविणारा काहीच पुरावा 'महाभारता'त आढळून येत नाही. असा समज झाला असता तर सर्व कौरववीरांनी एकच गिल्ला केला असता. पण तसे न करता ते अखेरपर्यंत लढत राहिले यावरून निदान त्यांचा तरी असा गैरसमज झाला नव्हता हे स्पष्ट दिसते. जयद्रथवध होण्यापूर्वी "सूर्य अस्तंगत होत आहे, पहा" असे कृष्णाने म्हटल्याचे सांगितले आहे. याचा अर्थ जयद्रथवध होण्यापूर्वी सूर्य आकाशात प्रकाशत होता. हे जर खरे तर जयद्रथवध झाल्यानंतर कृष्णाने काळोख नष्ट केला असे म्हणण्यात उघडउघड विसंगती आहे. जयद्रथवधानंतर त्यासंबंधी कौरवांच्या शिबिरात जी गरम चर्चा झाली, त्यात काळोख झाल्यामुळे फसगत झाल्याचा पुसटसुद्धा उल्लेख कोणी केला नाही. द्रोणाचार्यांच्या हलगर्जीपणामुळेच जयद्रथ मृत्युमुखी पडला असे मत दुर्योधनाने व्यक्त केले, तर कौरवांनी प्रयत्नांची पराकाष्ठा करूनही ज्याअर्थी जयद्रथाचा वध झाला. त्याअर्थी दैव सर्वांपेक्षा बलवत्तर म्हटले पाहिजे अशी भूमिका कर्णाने घेतली. सर्व कौरववीरांचा एकत्रित पराक्रमही अर्जुनाच्या युद्धकौशल्यापुढे अपुरा पडल्यामुळे जयद्रथाचा वध झाला असे निदान द्रोणाचार्यांनी केले. सारांश, सूर्यास्ताच्या भासामुळे कौरवांची फसगत झाली अशी तक्रार कोणीच केली नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. यावरून कृष्णाने दिवसा काळोख केल्याची घटना महाभारतात केवळ कल्पनारम्यतेसाठीच आली आहे असे वाटते. ते काही असो, व्यूहात प्रवेश केल्यापासून तो जयद्रथाचा वध करेपर्यंत अर्जुनाने आणि अर्जुनाला मदत करण्यासाठी त्याच लांबलचक मार्गाने अर्जुनापाशी आलेल्या सात्यकीने जो पराक्रम गाजविला, त्याला भारतीय युद्धातही तोड मिळणार नाही. "शूर जयद्रथाचा अर्जुनाने सात अक्षौहिणी सैन्यासह वध केला" हे दुर्योधनाचे दुःखोद्गार हेच दर्शवितात.

जयद्रथाचा वध झाल्यामुळे संतप्त होऊन कृपाचार्याने अर्जुनावर हल्ला केला, पण अर्जुनाने थोडा प्रतिकार करताच तो रथात मूर्च्छित होऊन पडला. यात अर्जुनाचा दोष काहीच नव्हता. हल्ला कृपाचार्याने केला होता आणि अर्जुनाने हल्ल्याचा प्रतिकार केला यात अनुचित असे काहीच नव्हते. प्रतिकार केला, तोही मामुलीच होता आणि कृपाचार्य मूर्च्छित पडला यात वस्तुतः शोक करण्यासारखे काही नव्हते. पण आपल्या बाणांनी आपले आचार्य पीडित झाले हे पाहून अर्जुनाचे मन कळवळून उठले. "धिःकार असो या क्षात्रधर्माला, बळाला आणि पौरुषाला! माझ्यासारखा आचार्यांशी द्रोह करणारा दुसरा कोणी असेल काय? ... कृपाचार्यांची ही दुरवस्था मला पुत्रवधाहूनही अधिक दुःख देत आहे ... आज मी शरवृष्टीने कृपाचार्यांना मूर्च्छित करून नरकाचेच साधन केले आहे! ... युद्धात पाठ न फिरवणाऱ्या पूज्य कृपाचार्यांना नमस्कार असो व त्यांच्यावर प्रहार करणाऱ्या मला धिःकार असो!" असा तो शोक करू लागला. गीतोपदेशामुळे अर्जुनाचा मोह संपूर्णपणे नष्ट झाला नव्हता, तो नष्ट होण्याची शक्यता नव्हती हे पुन्हा एकदा प्रत्ययास आले. याचवेळी कर्ण अर्जुनावर धावून आल्यामुळे अर्जुनाला आपले शोकप्रकरण आवरते घ्यावे लागले!

अर्जुन आणि सात्यकी या दोघांचीही द्रोणाचार्यांना ठार मारण्याची तयारी नव्हती. अर्जुनाने तर "मी युद्धात प्राणत्यागही करीन, पण आचार्यांचा प्रतिपक्षी होणार नाही" अशी भूमिका घेतली होती. शेवटी 'अश्वत्थामा मारला गेला' अशी वार्ता कृष्णाने प्रसृत केली आणि या असत्य वार्तेला युधिष्ठिराकडूनही दुजोरा देवविला. त्यामुळे द्रोणाचार्य शोकाकुल झाले आणि त्या अवस्थेतच धृष्टद्युम्नाने त्यांचा वध केला. शोकमग्न आणि निःशस्त्र असलेल्या द्रोणाचार्यांवर जेव्हा धृष्टद्युम्न धावून गेला, तेव्हा व्याकुळ होऊन "आचार्यांना मारू नकोस–त्यांना फक्त जिवंत धरून आण" अशी धृष्टद्युम्नाची अर्जुनाने परोपरीने विनवणी केली, पण तिकडे लक्ष न देता धृष्टद्युम्नाने द्रोणाचार्याचा शिरच्छेद केला. या घटनेमुळे पांडवांच्या गोटात इतकी खळबळ उडाली की सात्यकी आणि धृष्टद्युम्न यांचे युद्ध जुंपते की काय असे वाटू लागले. अर्जुनाचा विषाद तर दुथडी भरून वाहू लागला. द्रोणवधाला धर्मराज युधिष्ठिरही कारणीभूत झाला हे पाहून तर तो अतिशयच क्षुब्ध झाला. "तू केवळ राज्यलोभामुळे द्रोणाचार्यांशी खोटे बोल-






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लास ! तू धर्मज्ञ असूनही मोठा अधर्म केला आहेस ! वालीच्या वधामुळे जशी रामाची, तशी या वधामुळे तुझी अपकीर्ति तिन्ही लोकात कायमची राहील " असे युधिष्ठिराला दूषण देऊन, नंतर तो नेहमीप्रमाणे स्वतःलाही दूषण देऊ लागला. " आचार्यांचा घात होत असताना राज्यलोभाने मी त्याची उपेक्षा केली. त्यामुळे मी नरकात पडलो आहे" असा शोक त्याने चालवला. द्रोणाचार्यांचा वध करायला अर्जुन तयार नसल्याने प्राप्त परिस्थितीत कृष्णाने जे केले, ते बरोबरच होते. द्रोणवध झाल्याच्या आनंदात भीम धृष्टद्युम्नप्रभृति वीर आनन्दाने नाचू लागले, पण अर्जुन शोकसागरात बुडून गेला. मात्र जेव्हा पितृवधामुळे संतप्त झालेल्या अश्वत्थाम्याने सर्व पांडववीरांची तिरपीट उडवली, तेव्हा अर्जुनानेच अश्वत्थाम्याचे निवारण केले. पांडवाची मदार प्रामुख्याने अर्जुनावरच होती याची प्रचीति अशा रीतीने पुन्हा एकदा आली. द्रोणवधानंतर कर्ण कौरवांचा सेनापती झाला. कर्णाने सेनापतिपद दोन दिवस भूषविले. या दोन दिवसांत त्याने युधिष्ठिर, नकुल आणि सहदेव यांचा पूर्ण पराभव केला. कर्णाने विशेषतः युधिष्ठिराचे फारच हाल केले. पराभूत प्रतिस्पर्ध्याला अपमानास्पद शब्दांनी खिजविणे हा कर्णाचा आवडता छंद होता. त्यामुळे युधिष्ठिराचे शारीरिक आणि मानसिक स्वास्थ्य पार नष्ट झाले, इतके की शिबिरात जाऊन शय्येवर पडून राहण्याखेरीज त्याला दुसरे गत्यंतर उरले नाही. रणांगणात युधिष्ठिर दिसेनासा झाल्यामुळे अर्जुनाचा जीव खालीवर होऊ लागला. युधिष्ठिर शिबिरात गेला आहे असे समजताच त्याला भेटण्यासाठी तो कृष्णासह तिथे गेला. कर्णाचा वध न करताच अर्जुन आपल्याला भेटायला आला आहे असे जेव्हा संत्रस्त झालेल्या युधिष्ठिराला समजले, तेव्हा त्याचा तोल पार ढासळला. अर्जुनाची क्रूर निर्भर्त्सना करण्यास त्याने प्रारंभ केला. " दुरात्म्या अर्जुना, रणांगणातून पळून येण्यापेक्षा तू कुंतीच्या उदरी जन्मला नसतास अगर गर्भपात होऊन नष्ट झाला असतास तर ते फार बरे झाले असते " असे कटु वचन अर्जुनाला ऐकवून युधिष्ठिराने असमंजसपणाचा कळस केला. ज्याच्यासाठी आपण आपले सर्वस्व वेचले आणि वेचतो आहोत, त्या युधिष्ठिराच्या तोंडातून हे शब्द आल्याचे ऐकून अर्जुनही संतापाने बेभान झाला. विशेषतः 'तुझे गांडीव धनुष्य दुसऱ्याला देऊन टाक' या युधिष्ठिराच्या शब्दांनी त्याचे मनस्वास्थ्य पार धुळीस मिळविले. ' गांडीव धनुष्याबद्दल अपमानास्पद शब्द काढणाऱ्याचा शिरच्छेद करीन अशी त्याची प्रतिज्ञा असल्याने, युधिष्ठिराचा वध करण्यासाठी त्याने हातात खड्ग घेतले. केवळ युद्धात नव्हे तर युद्धकालातही कृष्ण सदैव अर्जुनाच्या बरोबर राहत असे याचे कारण अर्जुनाचा भावनावश स्वभाव हेच होते. कृष्णाचे संजीवक सान्निध्य हा त्या भावनावशतेवर तोडगा होता. कृष्णावर अपार निष्ठा असणारे अर्जुनाचे हळवे मन कृष्णाच्या सान्निध्यात तत्काळ विश्रांत होत असे. अर्जुनाच्या सर्व समस्यांना कृष्णाजवळ उत्तरे होती. आदरणीय माणसाला अपशब्दांनी ताडन करणे हे त्याचा वध करण्यासारखे असल्याने, या उपायानेच अर्जुनाने युधिष्ठिराचा वध करून प्रतिज्ञापालन करावे असे कृष्णाने अर्जुनाला सुचविले. ही सूचना शिरोधार्य मानून अर्जुनाने युधिष्ठिरावर इतक्या कटु शब्दांच्या फैरी झाडल्या की त्यामुळे शेवटी स्वतःवरच संतप्त होऊन प्रायश्चित्त म्हणून आत्महत्या करण्याचा त्याने निर्धार केला आणि त्यासाठी कोशातून त्याने आपली तरवार एकदम उपसली. " तरवार उपसण्यासारखे आता काय घडले आहे " असे कृष्णाने विचारताच, युधिष्ठिराशी निंद्य आचरण केल्याचे प्रायश्चित्त म्हणून आत्महत्या करण्याचा आपला निर्धार अर्जुनाने त्याच्याजवळ व्यक्त केला. हा निर्धार कसा पार पाडायचा हेही कृष्णाने अर्जुनाला दाखवून दिले. आत्मस्तुति करणे म्हणजेच आत्महत्या करणे होय असे सांगून कृष्णाने अर्जुनाकडून ' आत्महत्या ' घडवून आणली ! शेवटी गळ्यात गळा घालून युधिष्ठिर आणि अर्जुन मुक्तकंठाने रडू लागले आणि त्या अश्रुपातामुळे दोघांचीही मने परस्परांविषयी शुद्ध झाली. एकमेकांवर उत्कट प्रेम करणाऱ्या आणि आचारविचारांनी एकरूप असणाऱ्या दोन भावांची पुन्हा दिलजमाई झाली. कृष्णाच्या सान्निध्याची ती अपूर्व किमया होती.

ज्या युद्धाकडे सर्वांचे लक्ष लागले होते, ते कर्णार्जुनांचे निर्णायक युद्ध अखेर सुरू झाले. हे युद्ध बघायला देव–दानव, पशु-पक्षी आणि सर्व भूतगण उपस्थित











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

राहिले होते असे 'महाभारत'कारांनी वर्णन केले आहे. कर्ण आणि अर्जुन यांचा संग्राम बघण्याची सर्वांची उत्सुकता शिगेला पोचली होती, याच या अलंकारिक वर्णनाचा अर्थ आहे. नकुल आणि कर्णपुत्र वृषसेन यांच्यात झालेल्या युद्धाचे निमित्त होऊन हे दोन प्रबळ योद्धे एकमेकांवर तुटून पडले. वृषसेनाने नकुलाचा पूर्ण पराभव केला आणि आपला जीव वाचविण्यासाठी नकुलाने भीमाच्या रथात उडी मारली. तरीही वृषसेनाचा मारा चालू राहिल्यामुळे नकुलाने अर्जुनाला आपल्या मदतीला येण्याचे आवाहन केले. हाहा म्हणता सर्व कौरव-पांडव वीर या धुमश्चक्रीत सामील झाले. "माझ्या अनुपस्थितीत, अभिमन्यु एकटा सापडला असताना तुम्ही त्याचा निर्दयपणे वध केलात! कर्णा, वृषसेनाचा वध मी तुम्हा सर्वांसमक्ष करणार आहे. सामर्थ्य असल्यास त्याचे रक्षण करा!" असे आव्हान देऊन अर्जुनाने वृषसेनाचा शिरच्छेद केला. आपल्या समक्ष आणि आपल्याला सांगून अर्जुनाने वृषसेनाचा वध केला यामुळे कर्णाचा संताप अनावर झाला आणि तो अर्जुनावर धावून गेला. अखेरचा निर्णायक संग्राम अशा रीतीने सुरू झाला. कर्ण आणि अर्जुन यांच्या युद्धासंबंधी बरेच अपसमज प्रचलित असल्याने, ते युद्ध कसे झाले, हे काहीशा विस्ताराने बघणे जरूर आहे.

युद्ध सुरू झाले, तेव्हा कौरवांनी आणि कौरवपक्षीयांनी कर्णाभोवती कडे केले होते. पांडववीरही अर्जुनाभोवती एकत्रित झाले होते. प्रारंभी दोघांचेही हस्तलाघव इतक्या प्रकर्षाने प्रगट होऊ लागले की अखेर विजयी कोण होणार हे सांगणे त्यावेळी तरी कठीण होते. कर्णार्जुनाबरोबर त्यांच्याभोवती असलेले योद्धेही युद्धात सहभागी झाल्यामुळे त्या युद्धाने अतिशय उग्र स्वरूप धारण केले. कर्णाने अनेक पांचालांचा, तर अर्जुनाने अनेक कौरववीरांचा निकाल लावला. कधी कर्णाची तर कधी अर्जुनाची सरशी होत असल्यामुळे आपलाच निश्चित विजय होत आहे असे दोन्ही पक्षांना वाटू लागले. दोघांचेही अस्त्रनैपुण्य इतके विलक्षण होते की दोघात श्रेष्ठ कोण हे सांगणे बराच वेळ अशक्य होते.

युद्धात कृष्णाचा देहही कर्णशरांनी विदीर्ण झाला आहे हे पाहून अर्जुन अधिक त्वेषाने लढू लागला. अर्जुनाचे श्रेष्ठतर हस्तलाघव वेगाने प्रगट होऊ लागले आणि युद्धाच्या दुसऱ्या पर्वाला सुरवात झाली. कर्णाच्या निकट असलेल्या कौरववीरांवर अर्जुनाने इतकी अखंड आणि अचूक शरवृष्टि केली की ते सर्व कर्णाला एकाकी टाकून दूर पळून गेले आणि जिथे अर्जुनाचे बाण येऊ शकणार नाहीत अशा बिनधोक जागी जाऊन उभे राहिले. कौरव इतके दूर पळून गेले की कर्णाला सर्व दिशा भयाण दिसू लागल्या. तो एकाकी आणि असहाय्य झाला. कर्णार्जुन संग्रामातील ही महत्वाची घटना लक्षात घेणे आवश्यक आहे. पुढे कर्णरथाचे चाक खचले असता, तो दुसरा रथ का घेऊ शकला नाही किंवा दुसऱ्याच्या रथात बसून युद्ध का करू शकला नाही, याचे मर्म त्याशिवाय कळू शकणार नाही. रथ उध्वस्त वा नादुरुस्त झाला असता, रथी दुसऱ्याच्या रथात उडी मारून वा नवा रथ घेऊन युद्ध चालू ठेवत असल्याचे दाखले 'महाभारता'त वारंवार मिळतात. भीम, सात्यकी किंवा अर्जुन यांच्याशी यापूर्वी लढत असताना खुद्द कर्णाने या मार्गाचा कित्येकदा अवलंब केला होता. पण या वेळी सर्व कौरववीरांना दूर पळवून लावून अर्जुनाने कर्णाला मिळू शकणारी सर्व संभाव्य मदत बंद करून टाकली. अर्जुनाच्या श्रेष्ठ युद्धकौशल्यामुळे कर्णविजयाचे कौरवांचे स्वप्न वेगाने भंग पावू लागले. तथापि निराश न होता, कर्णाने आपला प्रतिकार कमी न होऊ देण्याची शिकस्त केली. कर्णाचा एक तेजस्वी बाण अर्जुनावर येत असता, कृष्णाने घोड्यांना गुडघे टेकवायला लावून रथ खाली दाबला आणि परिणामतः अर्जुनाचा किरीट भग्न होऊन खाली पडला. अर्जुनाने त्यानंतर कर्णावर प्रचंड शरवृष्टि केली; इतकी की त्यामुळे कर्णाचे अलंकार, कुंडले आणि कवचही भग्न झाले.

कवचहीन झालेल्या कर्णावर अर्जुनाने प्रखर हल्ला चढविला आणि युद्धाचा शेवट दृष्टिपथात येऊ लागला. भयंकर रक्तस्राव झाल्यामुळे कर्ण व्यथा पावून विव्हळू लागला. शोचनीय अवस्था झालेल्या कर्णावर शरवृष्टि करण्याचा अर्जुनाने सपाटा चालवला आणि एका तीक्ष्ण बाणाच्या आघातामुळे कर्ण रथात मूर्च्छित होऊन पडला. "या वेळी अर्जुनाने कर्णाचा सहज वध केला असता, पण त्याने तो केला नाही," असे महाभारतकारांनी म्हटले आहे. तथापि मूर्च्छित पडलेल्या











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

माणसावर अचूक शरसंधान करणे कठिण असल्यामुळे अर्जुन तसे करू शकला नाही असे मानणेच अधिक युक्त होईल. काही वेळाने सावध होऊन कर्ण पुन्हा लढू लागला पण तो आता पूर्वीचा कर्ण राहिला नव्हता. रक्ताने न्हालेल्या आणि असंख्य जखमांनी विद्ध झालेल्या कर्णाचे युद्धकौशल्य नष्ट झाले होते. त्याचे अस्त्रज्ञानही लुप्त झाल्यासारखे भासू लागले. परशुरामाच्या शापापेक्षा अर्जुनाच्या अतुल पराक्रमाचाच तो परिणाम होता हे उघड आहे. त्याची अशी दुर्दशा झाली असतानाच त्याच्या रथाचे डावे चाक भूमीत रुतले. कित्येक दिवसांच्या भयंकर युद्धामुळे रक्तस्नान झालेल्या भूमीत चाक रुतून बसावे यात नवल नव्हते. एका ब्राह्मणाने कर्णाला दिलेल्या शापामुळे पृथ्वीने त्याच्या रथाचे चाक गिळून टाकले हे या स्वाभाविक घटनेचे अलंकारिक स्पष्टीकरण वाटते. वर स्पष्ट केल्याप्रमाणे, दुसरा रथ घेणे किंवा दुसऱ्याच्या रथात बसून युद्ध करणे हे दोन्ही मार्ग कर्णाला आधीच बंद झाले होते. रुतलेले चाक बाहेर काढण्याचा प्रयत्न करण्याशिवाय कर्णाला त्यामुळे दुसरे गत्यंतरच उरले नाही. " भूमीत रुतलेले चाक मी वर काढीपर्यंत युद्ध थांबव" अशी त्याने अर्जुनाला विनंति केली आणि अर्जुनाच्या भावनेलाही आवाहन करण्याचा त्याने प्रयत्न चालविला. कृष्ण जवळ नसता, तर भावनाप्रधान अर्जुनाने ही विनंति ताबडतोब मान्य केली असती यात मुळीच शंका नाही. पण अर्जुनाला बोलण्याची संधी न देता कृष्णाने कर्णाची विनंती फेटाळून लावली आणि तसे करताना कर्णाच्या दुष्कृत्यांचा त्याने उपहासपूर्वक उच्चार केला. असे करण्यात जसा कर्णाला उत्तर देण्याचा, तसा अर्जुनाला भावनावश होऊ न देण्याची खबरदारी घेण्याचा कृष्णाचा हेतू होता. कृष्णाने कर्णाला दिलेले उत्तर ऐकून अर्जुन अधिक आवेशाने लढू लागला हे ' महाभारत 'कारांनी मुद्दाम नमूद केले आहे. कृष्णाचे सारथ्य, त्याचे सान्निध्य अर्जुनाला कसे संजीवक ठरले हे यावरूनही स्पष्ट होते. कृष्णाचे रोखठोक उत्तर ऐकून कर्णाने निमुटपणे युद्धाला प्रारंभ केला आणि एका बाणाने अर्जुनाला मूर्च्छित करून, तो पुन्हा चाक वर काढण्याच्या प्रयत्नाला लागला. त्या प्रयत्नात असतानाच सावध झालेल्या अर्जुनाने त्याचे शिर धडावेगळे केले. अर्जुन काही वेळ थांबला असता, तरी कर्णवध टळला असता असे नाही. कर्णाची अवस्था शेवटी शेवटी इतकी विकल झाली होती की अर्जुनाच्या हातून होणारा त्याचा वध हा केवळ वेळेचाच प्रश्न होता. तथापि ज्यानी आमरण माणुसकीची तत्त्वे पायदळी तुडविली, त्याना संकटात सापडल्यावर दुसऱ्यांपासूनही माणुसकीची अपेक्षा करण्याचा हक्क नाही हे महत्त्वाचे तत्त्व प्रस्थापित करण्यासाठीच कृष्णाने कर्णाचा अशाप्रकारे वध करवला हे स्पष्ट आहे. अर्जुनाने कर्णाचा अधर्मानेच वध केला नाही काय, हा प्रश्न म्हणूनच असमंजसपणाचा ठरतो.

कर्णाच्या वधामुळे भारतीय युद्ध संपले नाही तरी कर्णवधाबरोबर त्या युद्धाचाही निकाल लागला असे म्हणायला हरकत नाही. या युद्धात अनेक कौरवपांडव वीरांनी महान पराक्रम गाजवला हे खरे असले, तरी त्या युद्धातील अर्जुनाचा पराक्रम केवळ असामान्य होता. तथापि स्वजनांशी लढण्याचा प्रसंग आल्यामुळे अर्जुनाची भावनावशता वेळोवेळी कशी उफाळून येत असे हे वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. स्वतः हाताऩ शस्त्र घेण्याऐवजी, कृष्णाने अर्जुनाचे सारथ्य स्वीकारले, त्याचे कारण नेमके हेच होते. वेगवेगळ्या प्रसंगी वेगवेगळे उपाय योजून, अर्जुनाची भावनावशता पांडवाच्या हिताला बाधक होण्याइतकी अनावर होऊ न देण्यात कृष्णाने अलौकिक चातुर्य प्रगट केले. पांडवांचा विजय अखेर निश्चित झाला तो त्यामुळेच होय.

---








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. वा. दा. गाडगीळ

# ' निवृत्ति ' वाद्यांनी ' ज्ञान ' शब्दाचा केलेला दुरुपयोग !

माझ्यामते ' ज्ञान ' शब्दाची सुटसुटीत व्याख्या " ज्ञानेंद्रिये, मन, व बुद्धी यांच्याद्वारे होणारी नवीन माहिती " सजीव प्राणी, मुंगीपासून मनुष्यापर्यंत, जीवन सुखीकरण्यास, तसेच पोषण, संरक्षण व प्रजोत्पादन या तीन मूलभूत वासनांना तृप्त करण्यास 'ज्ञाना'ची अत्यंत आवश्यकता असते. सर्वात मानवप्राण्यामध्ये ' मन' व 'बुद्धी'चा विकास पराकाष्ठेचा झालेला आहे. नवीन मिळविलेले ज्ञान मागील प्राप्त झालेल्या ज्ञानाशी जुळवून त्यांच्याशी समन्वय करण्याची त्याच्या बुद्धीची शक्ती वाढलेली आहे. म्हणूनच विचारशक्ती, अनुमाने, तर्क, कल्पना इ. करण्याच्या शक्तीचा विकास मानवात पराकाष्ठेचा झालेला आहे. अर्थात यापासून जसे फायदे झाले आहेत तसेच तोटेही झालेले आहेत. ' कल्पना' शक्तीचा अतिरेक मानवाने पुष्कळच केलेला आहे. एवढेच नव्हे तर काही वेळेस त्यानी कल्पना-शक्तीवर बलात्कारही केलेला आहे ! विशेषतः आमच्या भारतातील ' निवृत्ति ' वाद्यांनी हा बलात्कार केलेला स्पष्टच दाखविता येतो. त्यामुळे भारतात अवास्तवावर श्रद्धा व वास्तवाकडे दुर्लक्ष. हे दोन महादोष भारतीय समाजाच्या हाडीमासी खिळलेले दिसतात ! बौद्ध व जैन तत्वज्ञानांनी समाजावर ' निवृत्तीची ' झापड उत्पन्न केली. ती घालविण्यापेक्षा शंकराचार्यांच्या अद्वैत वेदान्ततत्त्वज्ञानाने ही झापड दशगुणित वृद्धिंगतच केली ! जैन व बौद्ध शून्यवादी म्हणून त्यांचे तत्वज्ञान तकलादू होते, पण शंकराचार्यांनी मोक्षांचे म्हणजे ' जीवशिवैक्या'चे अंतिम ध्येय मानवापुढे ठेवले. त्याने समाजाच्या मनावरील निवृत्तिवाद बलवत्तर होऊन त्याची महान दिशाभूल झाली ! ही निवृत्तीची झापड या विसाव्या शतकातही भारतीय समाज-मनातून अद्यापही गेली नाही !

बौद्ध व जैन तत्त्वज्ञांनी यज्ञातील पशुहिंसेचा वीट येऊन आपल्या तत्त्वज्ञानात अहिंसेला प्राधान्य दिले. आणि बौद्धांनी ' अहिंसे 'बरोबरच वासनांचा त्याग, सुखोपभोगांचा त्याग इत्यादी त्यागांचे महत्व वर्णिले. पण अद्वैत वेदान्त्यांचे पर्यवसान या सर्व त्यागावर शिखर म्हणून जगाचा त्याग व संसाराचा त्याग ' संन्यास ' हेच मोक्ष प्राप्तीचे साधन असे मानले आहे. अर्थात त्याना ' ज्ञाना'चीच व्याख्या बदलणे भाग झाले ! ' ब्रह्म' सत्य व ' जग मिथ्या' या सिद्धान्ताला पोषक असे जे 'ज्ञान' तेच ' ज्ञान. ' इतर सर्व ' अज्ञा'न, असा विचित्र निष्कर्ष त्यानी काढला ! जगच मिथ्या. अर्थात मानवी शरीर व त्यातील इंद्रियेही मिथ्या म्हणून मानवी ज्ञानेंद्रियांनी होणारे ज्ञानही मिथ्या ! भ्रमात्मक ! का तर, ते ऐहिक विषयात गोडी उत्पन्न करतात. मोक्षाला बाधक जर काही असेल तर हा ऐहिक संसार ! म्हणून त्याचा त्याग केला पाहिजे ! या ऐहिकांची वृद्धी करणारी शास्त्रे कृषी, भूमिती, ग्रहज्योतिष, गणित, व्याकरण, छंद, काव्य, इ. शास्त्रांची वैदिककाळी प्रगती झाली होती, ती वेदान्त्यांनी सर्व मिथ्या ज्ञान प्रतिपादन करणारी ठरविली ! व अद्वैत ज्ञान हेच खरे ज्ञान ! बाकी सर्व अज्ञान ! असे, कंठरवाने वेदान्ती म्हणू लागले !

संसार नुसता असारच नाही तर तो दुःखमय आहे. क्षणभंगुर म्हणजे नाशवंत आहे. मायामोहाचा आहे. फसविणारा आहे ! त्यांत गुरफटून मानव आपला नाश करून घेतो ! इ. इ. अशी वैराग्याची शिकवण आमच्या कथाकीर्तनातून व पुराणातून अनेक शतके चालू राहिली. मनुष्याला जिवंत रहाण्याची पराकाष्ठेची इच्छा असते. म्हणून स्वतःचा संसार, अन्नप्राप्ती-धनप्राप्ती, स्त्री, घरदार, शेतवाडी,, जुजबी उद्योगधंदे हे वैय्यक्तिक संसार नाहीसे होणे अशक्य म्हणून टिकले, तरी वैराग्याचे पीक या जगात भारताइतके अन्य देशात कधीच आले नाही ! येथे अद्यापही 'कोटींच्या' संख्येने भणंग भिकारी ' साधू, संत, बुवा ' व बैरागी आणि प्रतिष्ठित अद्वैततत्वज्ञान प्रतिपादून निर्वाह करणारे असंख्य आहेत ! खरे ज्ञान म्हणजे अद्वैत ज्ञान. या संबंधी ज्ञानेश्वर म्हणतात–

" परमात्म सुखाचा ठेवा प्राप्त होण्यास योगी, जे ' ज्ञान'रूपी अंजन आपल्या बुद्धिरूपी नेत्रात घालण्यास विसंबत नाहीत. ज्यात सर्व कर्मांचा लय होतो म्हणजेच जे नैष्कर्म्यबोधाची खाण आहे, आत्मसुखार्थ जे भुकेले आहेत त्यांच्या साधनांची जे तृप्ति आहे. ज्यांचे ठिकाणी प्रवृत्ति पांगळी होते. तर्काची दृष्टी जाते. ज्यांच्या योगाने इंद्रियांना विषयाचा विसर पडतो ते जे ज्ञान ( अ. ४ ). वेदान्त्यांची तोंडे बंद करण्याची युक्ती ही. ते म्हणतात–






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" अचिन्त्या खलु ये भावाः न तांस्तर्केण साधयेत् " "यो बुद्धेः परतस्तु सः " अध्यात्मातील आदि तत्व जे ' ब्रह्म ' ते बुद्धिग्राह्य नाहीच ! ते बुद्धीच्या पलीकडील असल्यामुळे तेथे तर्क वगैरे ज्ञानसाधने निरुपयोगी. असे ठासून सांगतात. पण हे समाजाला ठसविण्यास स्वतःच्याच बुद्धीचा ते उपयोग करतात ! व समाजाच्या बुद्धीवरच ठसवितात ! वस्तुतः जे बुद्धिग्राह्य नाही. जे बुद्धीच्याही पलीकडे आहे ते नसल्यातच जमा झाले पाहिजे ! उपनिषदातील ' ब्रह्मा'चे वर्णन सर्व धरसोडीचे आहे. कारण ' ब्रह्म ' हे कल्पनेतील आहे. अवास्तव आहे. ते " अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसमते-गंधवच्च यत । अनाद्यनंत महतः परं ध्रुवं, ( कठ ३·१५ ) जे वर्णन आहे. त्यावरून ' ब्रह्म ' ही कल्पना आहे. वास्तव नाही. हेच सिद्ध होते. हे जे कल्पनेतील कल्पना हीच म्हणे सत्य. आणि याच्या व्यतिरिक्त दिसते, अनुभवते, ते सर्व खोटे. मिथ्या ! असा ठासून सिद्धान्त मांडतात ! एवढेच नव्हे, सत्य ज्ञान, विद्या इ. शब्दही या कल्पित ब्रम्हासच लावले पाहिजेत असाही आग्रह धरतात आणि याच्या शिवाय बाकी जे दिसते, प्रत्ययास येते, अनुभवताही येते ते सर्व मिथ्या, ती सर्व अविद्या. तात्पर्य नुसत्या ज्ञान शब्दाचाच त्यानी दुरुपयोग केला असे नाही तर ' सत्य ' ' विद्या ' इ. शब्दांचाही त्यांनी दुरुपयोग केला आहे ! •

## साक्षात्कार

या ' ब्रम्हा'सच सत्य का म्हणावयाचे तर त्याचा ' साक्षात्कार ' होतो असे त्यांचे म्हणणे. वस्तुतः हा ' साक्षात्कार ' ही कल्पनाच; प्रत्यक्ष ' साक्षात्कार ' झालेली माणसे अद्याप कोणाला भेटलीच नाहीत ! कारण ज्याना ज्यांना साक्षात्कार होतो त्यानी तसे सांगू नये असाही अलिखित नियम वेदांत्यानी मनाने कल्पिला आहे. ज्या ज्या उपनिषदात हे ब्रम्हाचे वर्णन आहे. त्यास आकार नाही पण सर्व आकार त्याचेच आहेत. ते सत् आहे व असत् ही आहे इ. जी वर्णने आहेत; अर्थात लिहिणाराना ' साक्षात्कार ' झाले होते असे मानावयाचे. शंकराचार्यांना स्वतः, साक्षात्कार झाल्याचे ऐकिवात नाही. त्यानी उपनिषदे लिहिणाऱ्या ऋषि, मुनीना साक्षात्कार झाला असला पाहिजे असे मानिले. ज्ञानेश्वर माऊलीने शंकराचार्यांना साक्षात्कार झाला असला पाहिजे असे मानले आणि आम्ही पामर जन ज्ञानेश्वरांना साक्षात्कार झाला असला पाहिजे असे मानतो. तात्पर्य खरा साक्षात्कार कोणाला झाला असेल असे मानण्यास आधार नाही. दृश्य, सत्य, अस्तित्व असलेल्याचा प्रत्यय ज्ञानेंद्रियांना येऊ शकतो, आधुनिक विज्ञानाचे ज्ञान टेस्ट ट्यूब, टेलिस्कोप, मायक्रोस्कोप इ. साधनानी होऊ शकते. पण बुद्धीच्या पलीकडील ज्ञान व्हावयाचे कसे ? तर साक्षात्कारानी. पण हे साक्षात्कार कोणाच्याच अनुभवास येत नाहीत, तेव्हा दुसरे साधन म्हणजे दृष्टान्तांचे. म्हणून रज्जू सर्प, शिंप चांदी ' मृगजल ' इ. इ. अनेक दृष्टान्तानी हा विषय मनावर ठसविण्याचे प्रयोग वेदान्तांच्या ग्रंथात प्राचुर्याने दिसतात.

या विश्वाच्या ' बुडाशी ' काही तरी शक्ती असली पाहिजे. या अनुमानावर ' ब्रह्मा'ची कल्पना आमच्या उपनिषदात आली आणि पुढे या कल्पनेला आणखी एक फाटा फुटून ' जीवात्मा ' कल्पावा लागला. विश्वाच्या बुडाशी जे ब्रह्म आहे. तेच ब्रह्म जीवाच्या शरीरात शिरले म्हणजे, तो ' जीवात्मा ' होतो. अशी कल्पना केली गेली. अर्थात " मूल, स्वतंत्र, अव्यक्त, सर्व व्यापी, नित्य, शुद्ध, बुद्ध अविकारी व अकर्तृत्वी " हे जे कल्पित ब्रह्माचे कल्पित गुण, तेच फाटा फुटलेल्या ' जीवात्म्या'चे गुण मानणे भाग पडते. हा जो सजीव प्राण्यात विशेषतः मनुष्यप्राण्याच्या शरीरात ' जीवात्मा ' म्हणून जो घुसलेला वेदान्त्यानी मानला आहे. आणि तोही ब्रह्माच्याच गुणाचा मानला आहे त्यालाही वस्तुतः काडीचाही आधार नाही. मानवी मनाचा प्रत्यय येतो. त्याच्या बुद्धीचा प्रत्यय येतो. पण आत्म्याचा प्रत्यय येत नाही. कारण तो अविकारी व अकर्तृत्वीच मानला आहे. तरी कल्पित ब्रह्मज्ञानास जे महत्व, ते या कल्पित आत्म्यासही महत्व आहे. कल्पनांना फाटे कसे फुटतात व कल्पनाशक्तीवर बलात्कार कसा होतो हे आमच्या वेदान्त ज्ञानात चांगले प्रत्ययास येते. ब्रह्म सत्यम् जगन्मिथ्या ' ब्रह्मा ' शिवाय दुसरे काही नाहीच हा अद्वैत सिद्धान्त शंकराचार्यांनी प्रस्थापित केला. तो भौतिक आधाराने नव्हे, तर कल्पनावर भर देऊन हेच खरे ज्ञान. हीच खरी विद्या. असे ठरविले. आणि मानवाचे मुख्य ध्येय ' मोक्ष ' प्राप्ती करून घेणे अर्थात हा मोक्षही कल्पितच मोक्ष म्हणजे शरीराच्या कोंडीत सांपडलेल्या आत्म्याचे परमात्मा म्ह० विश्वाच्या



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बुडाशी असलेले जे ' ब्रह्म '- त्या ब्रम्हयाशी मीलन होणे ! हे काही टेस्टटयूबने सिद्ध करून दाखविता येत नाही म्हणून वेदान्तशास्त्रातील टेस्टटयूब म्ह० दृष्टांत ! हा मोक्ष कसा मिळतो तर घटामध्ये जे आकाश असते. ते घट फुटल्यावर बाहेरच्या ' आकाशा'त जसे मिळते तद्वत शरीरातील ' जीवात्मा ' शरीर मृत्युनंतर बाह्य जगांतील ' ब्रम्हात विलीन होतो ! व जीवास मोक्ष मिळतो ! कल्पनाच ! प्रत्यक्ष 'स्वर्ग, जसा कोणी पाहिला नाही. तसाच हा मोक्षही कोणी पाहिला नाही. व अनुभवलाही नाही. पण सत्यज्ञान हेच म्हणून अट्टाहास !

हा जो ' मोक्ष ' तो सर्वानाच मिळतो असे मात्र नाही. तर ज्यानी संसार सोडला व पूर्ण वैराग्य धारण केले. इंद्रियानी त्यांच्या त्यांच्या विषयाचे सुख भोगणे सोडले पाहिजे ! डोळयानी पहाण्याची क्रिया सोडली पाहिजे, कानानी ऐकणे सोडले पाहिजे. जिव्हेने रस घेणे सोडले पाहिजे. तात्पर्य ज्ञानेंद्रिये सर्व बधिर करून टाकली पाहिजेत ! म्हणजे आपोआपच कर्मेंद्रिये ही आपले काम सोडून देतील. म्हणजे जीवास 'शरीरा'चा विसर पडला पाहिजे ! म्हणजे खरे वैराग्य ! या वैराग्यप्राप्तीनंतर मोक्ष म्हणजे जीवात्म्याला ब्रह्माशी विलीन होता येते असे ठासून प्रतिपादिले जाते ? तात्पर्य मोक्षाला आड येणारा मोठा अडसर म्हणजे ' जग ' खरे मानणे ! व मनुष्याने जिवंत रहाण्याचा प्रयत्न करणे ! असेच तात्पर्य निघेते. अर्थात जे मानीत नाहीत. ज्याना जग खरे वाटते. जे ज्ञानेंद्रियाचा व कर्मेंद्रियाचा उपभोग घेतात, वासनावृत्तीची धडपड करतात. त्यांचा जीवात्मा पुनः शरीर धारण करून पुनः जन्मास येतो. दुःखाच्या सागरात पडतो ! जन्ममृत्यूच्या फेऱ्यात सापडतो ! वगैरे वगैरे. या जन्ममृत्युच्या फेऱ्यात सापडल्याचे भयानक वर्णन करणारे ग्रंथ वेदान्त वाङ्मयात आहेतच ! अर्थात ही सर्व कल्पना, कल्पनाशक्तीवरील बलात्कारच आहे ! हा जो जीवात्मा जिवंत रहाण्याचा प्रयत्न करतो. विषयेंद्रियांचा उपभोग घेतो त्याला वैराग्य प्राप्त होत नाही. तो 'अज्ञानात' अविद्येत मायेत सापडलेला प्राणी म्हणून त्याची भरपूर निंदा वेदान्तग्रंथात पहाण्यास सापडते ! खरे वैराग्य ज्याला उत्पन्न होते. त्याला शरीराचा व इंद्रियांचा विसर पडतो. हे वैराग्य प्राप्त व्हावयास सर्व कर्मे सोडली पाहिजेत ! आणि सदोदित ध्यानात निमग्न झाले पाहिजे ! ध्यान या शब्दाचा खरा अर्थ, विचाराने– साधक बाधक विचारात काही काळ निमग्न असणे, पण हा खरा अर्थ वेदान्त्यानी मान्य केला, तर तो वेदान्ती कसला ? वेदान्त्यांचे ध्यान म्हणजे " मनात कसलाही विचार येऊ न देणे । " निर्विचार निर्विकार मनाची अवस्था करणे म्हणजे ध्यान ! निर्विकारविचार अशी मनाची अवस्था वस्तुतः एक दोन मिनिटापेक्षा ज्यास्त होऊच शकत नाही ! पण वेदान्त्यांचे खरे ' ध्यान ' म्हणजे दिवसाचे दिवस, महिनेच्या महिने, वर्षाची वर्षे अशी अनेक तपे जो ध्यानात घालवितो इतका की अंगावर वारुळे वाढली तरी त्याला खबर नसते ! असा जो ध्यानी. तो खरा ज्ञानी ! ! हे ' ध्यान ' मुळात बौद्धानी आणले ! ' ध्यान ' हेच बौद्धांचे अंतिम निर्वाण ! बौद्धमूर्ति सर्व ध्यानाच्याच दिसतील. वेदान्त्यानी ' ध्यान ' 'बाह्य ज्ञान कर्मेंद्रियांना आवरण्याइतकेच पत्करले. ' नैष्कर्म्य ' सिद्धीसाठी ध्यान ! म्हणून ज्ञान, वैराग्य, ध्यान, हे अद्वैत वेदान्ताच्या पायऱ्या आहेत. ज्ञानाची परिणती वैराग्यात झाली पाहिजे ! वैराग्याची परिणती नैष्कर्मात झाली पाहिजे ! असा जो असेल तोच खरा ' मुमुक्षु '. अशा मुमुक्षूनाच मोक्ष मिळू शकतो. ही वेदान्त्यांची विचारसरणी आमच्या सुसंस्कृत समाजमनावर पक्की ठसली गेली आहे. म्हणजे आमच्या समाजातील हजार ज्ञानी म्ह० ऐहिकातील– ( वेदान्त्यांचे ज्ञानी नव्हेत ) ९९९ ज्ञान्याना हे वेदान्ती वैराग्य साध्य होणेच अशक्य. मग सामान्य मनुष्याना तर शक्यच नव्हे ! पण बहुसंख्य समाजाला जे अशक्य तेच मोक्षप्राप्तीचे खरे साधन. असे आमचा समाज अद्यापही मानतो ! हे परम ध्येय आमच्या समाजाला अद्यापही मान्य वाटते ! त्याचा परिणाम एवढाच होतो की आम्ही स्वतःचा संसार करतो. त्यातच निमग्न असतो. आणि फावल्या वेळेला ही वेदान्त्याची प्रवचने ऐकतो. त्यावेळेसच आम्हास खरी शान्ती मिळते असेही म्हणत असतो. पण स्वतःच्या संसारात वैराग्यप्राप्ती अशक्य म्हणून सामाजिक संसारात मात्र वैराग्य धारण करतो ! आमच्या समाजाला देशाभिमानाची कल्पना जोपर्यंत नव्हती तोपर्यंत सामाजिक म्हणजे धार्मिक चळवळ होती. तीत आम्ही लक्ष घालीत होतो. सार्वजनिक देवळे, धर्मशाळा, घाट बांधणे, अन्नछत्रे कायम करणे, यात्रेकरूंच्या सोयी करणे हीच मोठी परोपकाराची कृत्ये









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समजली जात. राजकीय क्षेत्रात बहुसंख्य लोक लक्ष घालीतच नसत जे लहान मोठे राजे होते, त्यानीच त्याकडे लक्ष घालावे याचे तात्पर्य वेदान्त विचाराचा पगडा बसल्यामुळे आमचे ध्येय, 'स्वर्ग' 'मोक्ष' अशा भ्रामक विचाराचे होते. परोपकार धर्मापुरता होता. देशाचा समाजाचा खरा उद्धार कशात आहे याचा विचार आमच्यातील ज्ञानी म्हणविणारांनीही कधीच केला नाही !

## स्थितप्रज्ञ का हतप्रज्ञ

मुमुक्षु अवस्थेतच 'जीवन्मुक्ताची' म्हणून एक अवस्था वेदान्त्यानी कल्पिली आहे. त्यास 'स्थितप्रज्ञ' ही संज्ञा दिली आहे स्थितप्रज्ञ कसा असतो हे श्रीमद् भगवद्गीतेत, तपशीलवार वर्णिले आहे गीतेच्या दुसऱ्या अध्यायातच–

''प्रजहाति यदा कामान् सर्वान्पार्थमनोगतान् !'' इ. दहा पंधरा श्लोक त्यात आहेत त्यात वासनांचा त्याग करणारा, सुख दुःख मानापमान समान मानणारा, राग द्वेष सोडणाऱ्या संयमी मनुष्यास स्थितप्रज्ञ म्हणता येईल. पण ज्ञानेश्वरानी वर्णन केलेला 'स्थितप्रज्ञ हा' 'हतप्रज्ञ'च म्हणावा लागेल ! ते म्हणतात.

उत्तमाते धरिजे । अधमाते आव्हेरिजे ।
हे कांहींच नेणिजे । वसुधा जेवी ।।
गाईची तृषा हरू । व्याघ्रा विष होऊनि मारू ।
ऐसे नेणेचि गा करू । तोय जैसे
जो खांडावया घाव घाली । कां लावणी जयाने केली ।
दोघां एकचि सांवली । वृक्ष दे जैसा ।।

–अशा एकापाठी एक दहा ओव्या आहेत. दृष्टांत देण्याची प्रतिभा ज्ञानेश्वरांसारखी दुसऱ्या लेखकात मिळणे अशक्य. भाषा खरोखर अमृतापेक्षाही गोड ! पण अर्थ व त्यातील विचार वेदान्त्यांचे ग्रहण लागल्यामुळे अशक्यप्रायच नव्हेतर वेडेपणाचे ! उत्तमाते धरिजे। व अधमाते आव्हेरिजे असेच. कोणीही शहाणा ज्ञानी मनुष्य सांगेल; पण पृथ्वी जशी याचा विचार करीत नाही. तसाच तूही याचा विचार करू नको ! व उत्तमाप्रमाणेच अधमालाही आश्रय दे असे सांगणे वेडेपणाचे नाही का ? दृष्टातात दिलेली सर्व उदाहरणे निर्जीव वस्तूंची दिलेली आहेत. ज्या मनुष्यास 'मन व 'बुद्धी'ची देणगी मिळाली आहे त्यानेही निर्जिव वस्तू प्रमाणे वागण्यास सांगणे म्हणजे अशक्य गोष्टी करण्यास सांगण्यासारखे नाही का ? वेडेच अशा प्रमाणे वागतात त्याना राग द्वेष नसतो. आणि असे वेडेच आमच्या समाजात राजरोस 'सिद्ध' 'महापुरुष' गणले जातात ! आणि मूर्ख लोक त्याना गुरुही करतात !

तात्पर्य उदात्त, भव्य विचाराचे आदर्श म्हणून वेदान्त्यानी समाजात वैराग्याचा प्रसार व्हावा म्हणून शक्य तेव्हढी खटपट केलेली दिसेल ! त्याचा परिणाम एवढाच झाला की स्वहितासाठी स्वतःच्या संसारासाठी वैराग्य न धरता, सार्वजनिक सामाजिक राष्ट्रीय कामात मात्र समाजाने पूर्ण वैराग्याचा अंगिकार केला !

'जन्म-मृत्यूचे फेरे नाहीसे करावयाचे' हेच मानवी ध्येय. चुकून जन्मास आलो, मागच्या पापाने जन्मास आलो अशी भावना उत्पन्न झाली. उत्पन्न होऊन या दुःखमय मायेच्या जंजाळात पडलो ! याचा त्याग करण्याचीच खटपट केली पाहिजे ! असे ज्यांचे विचार तोच 'ज्ञानी' या संज्ञेस पात्र हे आमच्या समाज–मनावर बिंबविण्याचा प्रयत्न आमच्या गत वाङ्मयात भरपूर झालेला आढळेल.

## ईश्वराचे वेड

वेदान्ती औपनिषदीय विचार तेच ज्ञान्याचे विचार. पण पुराणातून 'ब्रम्हा' पेक्षा 'ईश्वरा' संबंधीच ज्यास्त वर्णिलेले आहे. 'मानवी' मनात 'ईश्वर.' कल्पना, म्हणजे कार्यकारण भावाने या जगाचा कर्ता असलाच पाहिजे. व तो 'ईश्वरच आहे हे जगातील सर्व मानवप्राण्यांना मान्य होणे साहजिक आहे. ईश्वराला मानणे ही कल्पनाच आहे. कल्पनाशक्तीवर बलात्कार नाही. पण याच्यापुढे जाऊन आमच्या धर्मात व पौराणिक वाङ्मयात ईश्वरासंबंधी जे वाङ्मय-भांडार उत्पन्न झाले आहे. त्यात कल्पनाशक्तीचा भयंकर अपव्यय दिसून येतो ! ईश्वर कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम् समर्थ मानला तरी हरकत नाही. पण याच्या पुढील कल्पना तो स्तुतिस्तोत्रानी व पुजे अर्चेने प्रसन्न होतो. नैवेद्याने तृप्त होतो, नवसाला पावतो. इ. मानव स्वभाव देवावर लादून, त्याप्रमाणे सर्व समाज जो वागतो, व अहर्निश देवपूजेत व भजन करण्यात जो घालवितो तोच खरा साधू, संत श्रेष्ठ, त्याच्या भजनी लागून पुढे त्यालाही देवाप्रमाणे मानणे व, गुरु-र्ब्रम्हा, गुरुर्विष्णुः, गुरुर्देवोमहेश्वरः गुरुः साक्षात् परब्रह्म' म्हणजे हा कल्पनाशक्तीवर बलात्कार नाही का ? गत अनेक शतकात आमचा समाज या कल्पनांनी इतका



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भारला गेला होता व ' भक्ति मार्गा'चा जो भलताच विपर्यास झाला, त्याचेच परिणाम आमच्या अनेक शत-काच्या गुलामगिरीच्या रूपाने आम्हास भोगावे लागले.

इंग्रजी शिक्षणापासून व इंग्रजी राज्यामुळे आम्हास ' देशाभिमानाच्या कल्पना उत्पन्न झाल्या व देवाचे वेड हळू हळू थंडावू लागले. पण अद्यापही आमच्या समाजमनावरील निवृत्तीची धर्मवेडेपणाची, व देवभोळे-पणाची झापड कायमच आहे ! ही झापड कशी कायम आहे याचे थोड्या शब्दात रेखाटलेले चित्र नवभारत मासिकाच्या फेब्रुअरी १९६७ च्या अंकात डॉ. इंदुमती पारीख यांच्या लेखात दिसते. हा सर्वच लेख प्रत्येकाने मननपूर्वक वाचण्यासारखा आहे. त्या म्हणतात, " आमच्या समाजात शास्त्रीय संशोधनाने कधीच धक्के दिले नाहीत. त्यामुळे इथल्या समाजाच्या व विशेषतः व्यक्तीच्या धार्मिक कल्पना डिवचल्या गेल्या नाहीत. आम्हाला शास्त्रांची ओळख यंत्राकरवी झाली. त्या मागचे संशोधन फार उशीरा आमच्यातील काहींना समजू लागले. त्यामुळे त्याचा आमच्या वैचारिक जीव-नावर काहीही परिणाम झाला नाही. थोडाफार परिणाम होणे अपरिहार्य होते. अधिकच सनातनी असलेला आमचा दृष्टिकोन यंत्राप्रमाणे साचेबंद होण्यासच मदत मिळाली. यंत्र आले, ते समजण्याठी शास्त्रही आले, पण त्या बरोबर शास्त्रीय दृष्टिकोण आला नाही ! म्हणूनच औद्योगिक प्रगतीबरोबर व्यक्तीचा विकास झाला नाही; तर अनेक वेळा व्यक्ती अधोगतीस गेली ! व्यक्ती यंत्रवत् बनली. एका बाजूला पदार्थविज्ञान, रसायन, जीवशास्त्र यांचा अभ्यास करणारी ' माणसे आपल्या जीवनात दुटप्पी झाली ! शास्त्रज्ञ म्हणून न्यूटन, डार्विन, आइनस्टाइनचे सिद्धान्त मानणारी माणसे ग्रहणात स्नान, झाडपाल्याची पूजा करून त्याना देव मानणे, उपासतापासाने देवाला प्रसन्न करून घेण्याचा प्रयत्न करणे, तीर्थयात्रा करणे, अंगाला भस्म लावणे, जपजाप्य करणे यासारख्या कर्मकांडावर विश्वास ठेवून जीवनात त्याला प्राधान्य देत असलेले दिसतात! "

ही स्थिती सामान्य कर्मकांडावर विश्वास ठेवणाऱ्या मंडळींची झाली पण यांच्यापेक्षा उच्च विज्ञानशास्त्र पारंगत झालेले M. Sc वगैरे डिग्र्या घेतलेलेही वेदान्ताचे अभ्यासी कृष्णमूर्तींची शब्दावडंबराने भरलेली प्रवचने ऐकण्यात व ज्ञानेश्वरीवर निरनिराळे रटाळ लेख लिहि-ण्यात गुरफटून गेलेली दिसतात याचे आश्चर्य वाटते. ज्ञानेश्वरदर्शनावरील दोन प्रचंड खंड लिहिल्या नंतरही ज्ञानेश्वरीच्या निरनिराळ्या भागावर लिहिणारे निदान दोनशेच्या वर विद्वान महाराष्ट्रात निघाले आहेत ! मी ज्ञानेश्वरीला कमी महत्व देतो असे नाही. गीताभाष्य म्हणूनच नव्हे तर इतरही सद्विचार ज्ञानेश्वरीत प्राचुर्याने आहेत. त्यांची प्रतिभा कवीची आहे. तो सिद्धान्तापेक्षा काव्यग्रंथ आहे. केवळ गीतेचे तात्पर्य समजण्यासाठीच ज्ञानेश्वरीचे महत्व नाही, तर गीतेइतकाच तो स्वतंत्र ग्रंथ आहे, हे मला मान्य आहे. पण जेव्हा सध्याच्या वर्तमान जगाचा विचार करतो. आमच्या शेजारी जपान, जर्मनी, रशिया व चीनही या राष्ट्रांच्या उन्नत्ति-कडे पहातो व या राष्ट्राबरोबरीचे आम्ही झाल्याशिवाय आमचे जीवन शक्य होणार नाही हे जाणतो. ही राष्ट्रे कोणच्या भौतिक शास्त्रांनी उन्नत व समृद्ध झालेली आहेत हेही आम्ही जाणतो.

## आमचे जुने ग्रंथ

अशा जाणत्या स्थितीतही आमचे जुने ग्रंथ दुःख सोसण्यास सांगतात आम्ही जेव्हा आमचे जुने धार्मिक, व आध्यात्मिक ग्रंथ व त्यातील ज्ञान पहातो, तेव्हा आमचे ग्रंथ परलोकासाठी आहेत ! इहलोकी उपयोगी पडेल असे त्यात नीतिधर्माशिवाय काही नाही याची खात्री होते. तेव्हाही आम्ही आमच्या संस्कृतिरक्षणाचा बहाणा करून, जुनेच कित्ते गिरवीत बसतो. तेव्हा या देशाचे पुढे काय होणार याची काळजी साहजिक वाटते. आमचे जुने तत्त्वज्ञानाचे संस्कृत प्राकृत ग्रंथ सर्व कल्पनांच्या भराऱ्या आहेत. भावनांचा उद्रेक त्यात ज्यास्त, वास्तव बुद्धिवाद त्यात नाही. विचारा-पेक्षा विकार ज्यास्त वाढिवतात. त्या विकारातच मानसिक सौख्य व शान्ती आम्हास वाटते. आमचे सर्व जुने संस्कृत प्रकृत आम्हास संकटाचा व दुःखाचा परिहार कसा करावा हे शिकवीत नाहीत. तर संकटे सोसण्यासच उपयोगी पडतात ! ही संकटे सोसण्यातच आम्ही समाधान मानतो ' विवेके क्रिया पालटावी ' ही समर्थांची शिकवण आम्ही अद्याप स्वीकारली नाही. ' बळी तो कान पिळी ' हा नियम कोणच्याही कालात सत्य व अबाधित राहिला आहे. व्यक्तीपेक्षा आमचे समाजबल वाढले पाहिजे. विज्ञान-शास्त्राइतके बल वृद्धिंगत करण्यास आध्यात्मिक शास्त्रे उपयोगी पडत नाहीत. हा सध्याचा जगाचा अनुभव











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. आम्ही यंत्रे व त्या मागील विज्ञानशास्त्र जाणू लागलो आहोत पण त्याचे अध्ययन आपल्या समाजात आबाल वृद्धात वृद्धिंगत झाले पाहिजे ! हे अद्याप आमच्या मनावर ठसत नाही. मराठी भाषेतील ग्रंथ, वर्तमानपत्रे, मासिके इ. जे वाङ्मय या पन्नास वर्षात उत्पन्न झाले व सध्या होत आहे त्याचा आढावा काढला म्हणजे ही गोष्ट आपल्या प्रत्ययास येणारी आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरही अद्याप आमच्या मनावरील कल्पित अध्यात्माची झापड नाहीशी होत नाही ! कादंबऱ्या लघुकथांच्या खालोखाल आध्यात्मिक भक्तियुक्त वाङ्मय मराठी भाषेत प्राचुर्याने प्रसिद्ध होते व खपते ! अणुशक्तीवर लहानसे शास्त्रीय पुस्तक कोणी लिहिले तर त्याच्या शंभर प्रतीही खपणे शक्य दिसत नाही. पण तेच कोणी ' भक्तिलीलामृत ' नावाचे जुन्या सटरफटर कवीचेही रटाळ अभंग कोणी लिहिले व त्याची किंमत ५ रु. जरी ठेवली तरी त्याच्या हजारो प्रती सहज खपतील हा अनुभव आहे ! ही अभिरुची काय दाखविते. याचे कारण आमच्यातील चांगले विद्वान लेखकही विज्ञानशास्त्राची गोडी आबाल वृद्धांना लागावी असा प्रयत्नच करीत नाहीत. मराठीत दहा पंधरा जी मासिके निघतात त्यात 'प्रसाद ', ' पुरुषार्थ ' 'जीवन विकास ' इ. जी अध्यात्म भक्ती याना वाहिलेलीच मासिके जास्त खपतात. त्याच्या खालोखाल लघुकथांना वाहिलेली मासिके. किर्लोस्कर, ' उद्यम' 'नवभारत' हीच वैचारिक मासिके मराठीत आहेत. या तीन पेक्षा चौथे नाव समोर दिसत नाही ! दुय्यमच नव्हे तर उच्च कॉलेजचे सर्व शिक्षणही मराठी माध्यमातून झाले पाहिजे असा आग्रह आम्ही धरतो. पण उच्च शिक्षण विशेषतः विज्ञानशास्त्रीय शिक्षण देणारी मराठीत किती पुस्तके आहेत ? हाताच्या बोटावर मोजण्याइतकीही ती संख्या नाही ! मग मराठी माध्यमातून उच्च शास्त्रीय शिक्षण होणे कसे शक्य आहे ? तात्पर्य कल्पित अध्यात्माची झापड आमच्यातील विद्वान म्हणविणारांच्या डोक्यातून नाहीशी होत नाही. तेच खरे ज्ञान ही भावनाही अद्याप जात नाही. अध्यात्माच्या वाचनाने शान्ती मिळते. असे मत प्रतिपादणारे कित्येक लोक भेटले. पण ही शान्ती कशा प्रकारची असते याचा विचार ते करीत नाहीत. ' बुद्धिबळे ', ' पत्ते ' खेळण्यातही मन रममाण होते परंतु ते जसे हितकर नसते तसेच सध्या आपल्या राष्ट्रापुढे जो जीवनमरणाचा प्रश्न आहे, तो आमचे सामान्य जनमन विज्ञान शास्त्रीय झाल्याशिवाय सुटणार नाही. अध्यात्माने आमचे आतापर्यंत जे नुकसान केले त्याच्या शतगुणित पुढेही होईल. भगवद्गीता काय अथवा ज्ञानेश्वरी काय ही कुटुंबातील थकलेली म्हातारी माणसे असतात त्या प्रमाणे हे ग्रंथ आहेत. लग्न कार्य निघाल्यावर, देवप्रतिष्ठा बसवितात तेव्हा या वडील मंडळींना नुसता नमस्कार करावयाचा असतो, पण कार्ये किंवा समारंभ जे होतात त्यात त्यांचे मत काडीमात्र उपयोगी पडत नाही; उपयोगी पडतात ती मते म्हणजे स्वतःचे कुटुंब अथवा बरोबरीची इष्ट मित्रमंडळीचीच मते त्यावेळेस उपयोगी पडतात. आधुनिक जगात आमच्यापुढे जे जीवनमरणाचे प्रश्न आहेत, ते आधुनिक विज्ञानशास्त्रे जितकी आम्ही आत्मसात करू, तितके आमचे यश निश्चित. पश्चिम जर्मनी, इस्रायल, जपान, ही राष्ट्रे आमच्या डोळ्यादेखत जी या चाळीस वर्षात समर्थ बनली आहेत ती कल्पित अध्यात्मशास्त्रानी नसून विज्ञानशास्त्रानीच ती सामर्थ्यवान, व संपन्न झाली आहेत ! खऱ्या ज्ञानानेच ती संपन्न झाली आहेत ! ' अणुबॉम्ब'चा आम्ही आमच्या ऐदीपणास शोभेसा उगाच बाऊ करतो, व त्याने जगाचा विनाश होईल असे मानतो. आणि आमच्या अध्यात्मानेच हा विनाश थांबेल असेही आढ्यतेने प्रतिपादन करतो. पण वस्तुस्थिती तशी नाही. अणुबाम्ब कितीही विनाशकारी असला, तरी राष्ट्राराष्ट्रात धाक उत्पन्न करणारा आहे. व या धाकानेच जगात शांतता स्थापन होऊ शकेल. हेही अनुभवसिद्ध आहे. पूर्वीच्या तिरकमठ्यापेक्षा तरवारी विनाशकारी निघाल्या. ' तरवारी ' पेक्षा बंदुका विनाशकारी, साध्या बंदुकीपेक्षा लांब पल्ल्याच्या बंदुका, त्यापेक्षा तोफा विनाशकारी याप्रमाणे एकापेक्षा एक वरचढ विनाशकारी हत्यारे आली तरी जर जग नाश पावले नाही, तर अणुबॉम्ब शतपटीने विनाशकारी असले तरी ते प्रत्येक राष्ट्राने स्वीकारलेच पाहिजेत. त्यास घाबरण्याचे काही कारण नाही. मानवी मन जगण्याचाच प्रयत्न करील. ' ' बळी तो कान पिळी ' हा नैसर्गिक न्याय अबाधित आहे व अबाधितच रहाणार ! तो अध्यात्म ज्ञानानेही बदललेला नाहीच ! तेव्हा आधुनिक विज्ञान ज्ञानसंपादनानेच आम्ही संपन्न व सामर्थ्यवान होऊ शकू. हेच खरे ज्ञान. अध्यात्म हे कल्पनेने उत्पन्न केलेले मिथ्या ज्ञान आहे. हेच मानवइतिहासाने सिद्ध केले आहे.



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. सुशीला पाटील

# महम्मद दारा शुको – व्यक्ती आणि कर्तृत्व

## ऐतिहासिक पार्श्वभूमी

भारतीय इतिहासातील जवळ जवळ अडीच शतकांचा काळ मोगल राजवटीने व्यापलेला आहे. एवढ्या कालावधीत भारतीय संस्कृतीत या राजवटीने एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान पटकावले. इ. स. १५२६ मध्ये बाबराने दौलतखान लोदीचे निमंत्रण स्वीकारून या आर्यभूमीवर पाय ठेवला. आणि ज्या युद्धासाठी त्याला साहाय्यक म्हणून पाचारण करण्यात आले होते त्या युद्धानंतर परत फिरण्याचा विचार त्याने रद्द केला. दिल्लीला मोगल तख्त प्रस्थापित केले. बाबरापूर्वी कित्येक आक्रमक येथे येऊन गेले. त्यांचा खाक्या वेगळा होता. यावे, लुटालूट करावी, देवळे फोडावी, उंटांची कंबरडी मोडेपर्यंत हिरे, माणके, मोत्ये त्यांच्यावर लादावी आणि काबूल कंदाहारकडे परत फिरावे असा त्यांचा प्रघात होता. पित्याने स्थापन केलेले हे राज्य टिकविता टिकविता हुमायून मात्र घासाघूस झाला. मोगल साम्राज्याचे हे रोपटे कोमेजून जाते की काय असे वाटू लागले. पण हुमायूनचा मुलगा अकबर मोठा शिकंदर नशिबाचा निघाला. त्याच्या अद्वितीय कर्तृत्वाने मोगल साम्राज्य हिंदुस्थानात दृढमूल झाले. त्यात पुन्हा अकबराने भारतीय जनतेची नाडी बरोबर ओळखली. धर्म हा या राष्ट्राचा प्राण आहे व राष्ट्राचे वैभव वाढवावयाचे असेल तर धर्माची गळचेपी होता कामा नये हे त्याने ताडले. पूर्वीचा धर्मविषयक जुलूम बंद होताच मग राष्ट्रीय जीवन विविध दिशांनी फोफावू लागले. ललित कला आणि साहित्य यांना जोम चढू लागला.

## पितापुत्र

अकबर ते औरंगजब या कालखंडात सांस्कृतिक निर्मितीच्या बाबतीत शहाजहान व दारा शुको या पितापुत्रांची कामगिरी फार मौलिक स्वरूपाची ठरली आहे. दगड, विटा, माती यातून शहाजहानने निर्माण करविलेले अप्रतिम सौंदर्य अजूनही यमुनेच्या तीरी मोठ्या दिमाखाने उभे आहे. बापाने जसे पार्थिव सौंदर्याचे लेणे भारतीय संस्कृतीला चढविले. तसे मुलाने म्हणजे दाराने भारतीय वैचारिक संपत्तीचे अलंकार पर्शियन वाङ्मयाला चढविले. दिल्लीच्या परिसरात हिंडले की तेथील भव्य इमारतींवरून शहाजहानची आठवण येते तर पुरातन ग्रंथालयाच्या धर्म व तत्त्वज्ञान या दालनातून वावरताना दाराची आठवण होते.

## विलक्षण राजपुत्र

शहाजहानचा ज्येष्ठ पुत्र दारा शुको हा मोगल राजघराण्यात एक विलक्षण राजपुत्र होऊन गेला. दारा जन्मजात ज्ञानपिपासू वृत्तीचा पुरुष होता. त्याचा जन्म राजघराण्यात न होता एखाद्या सामान्य कुटुंबात झाला असता तर तो खरोखरच एक प्रख्यात साधु-पुरुष झाला असता आणि कबीर, रामानंद, गुरु नानक वगैरे संतांची पदवी त्याला प्राप्त झाली असती. दाराला अभिजात अशी दैवी संपद् लाभली होती. दाराचे हृदय विशाल होते. मन दिलदार होते. त्याची दृष्टी विस्तीर्ण व स्वच्छ होती. विचार क्रांतदर्शी होते. आणि ध्येयनिष्ठा अढळ होती. पण त्याचे हे सद्‌गुणच राजकीयदृष्ट्या त्याला धोक्याचे ठरले. तो होता त्यापेक्षा कमी सद्‌गुणी असता, तत्त्वज्ञानापेक्षा युद्धविद्येचा त्याने अधिक अभ्यास केला असता, उपनिषदे व इतर धर्मग्रंथ यांचा अनुवाद करीत बसण्यापेक्षा राजकीय डावपेचात त्याने अधिक लक्ष घातले असते तर तो क्रूर, कपटी व कसबी औरंगजेबाच्या भक्ष्यस्थानी पडला नसता. शहाजहाननंतर दारा गादीवर आला असता. औरंगजेब इतिहासाला अज्ञात राहिला असता. पण तसे व्हायचे नव्हते.

## जन्म व शिक्षण

इ. स. १६१५ च्या २० मार्चला शहाजहानचा ज्येष्ठ पुत्र या नात्याने जगात पाऊल ठेवणाऱ्या या जीवाचे नाव त्याच्या आजोबाने म्हणजे जहांगीराने 'महंमद दारा शुको' असे ठेवले. आणि जन्मतःच त्याला 'गुल्– इ– अव्वाली– गुलिस्तान इ– शाही' (मोगल साम्राज्योद्यानातील गुलाब पुष्प) हा किताब बहाल केला. तत्कालीन मोगल राजपुत्रांना मिळणारे प्राथमिक व दुय्यम शिक्षण दारालाही मिळाले. या शिक्षणक्रमात सामान्यतः कुराण, तैमूरलंग घराण्याचा इतिहास आणि पर्शियन काव्यातील वेचे यांचा



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अभ्यास होत असे. हस्तलेखन व तात्त्विक वादविवाद यांकडेही खास लक्ष देण्यात येत असे. दाराचे सर्व शिक्षण मुल्ला अब्दुल लतीफ सुलतानपुरी याच्या तालमीत झाले. अब्दुल लतीफची सर्व विद्या त्याने प्रतिबिंबाप्रमाणे ग्रहण केली. इतकेच नव्हे तर आपल्या गुरुंपासून उचललेली अभ्यासूवृत्ती व विवेचक बुद्धी दाराच्या ठिकाणी जन्मभर टिकून राहिली. कुराणाचा अभ्यासदेखील त्याने श्रद्धाळूपणे न करता तत्त्व-जिज्ञासूच्या दृष्टीने केला होता. सुलतानपुरींना आध्यात्मिक व बुद्धिप्रधान ग्रंथ वाचण्याचा छंद होता आणि तीच सवय दारालाही जडली. शहा-जहानला इतिहाची भारी आवड होती, पण दाराला इतिहास कंटाळवाणा वाटायचा. पर्शियन कवींपैकी फिर्दौसी व सादी यांच्यापेक्षा रुमी व जामी हे कवी दाराला विशेष आवडत. शहाजहान अलेक्झांडरच्या पराक्रमाचे गोडवे गायचा तर दारा ॲरिस्टॉटलच्या व प्लेटो यांच्यामध्ये मश्गुल असायचा. युद्धाच्या वर्णनापेक्षा साधुसंतांच्या चरित्रात दाराचे मन जास्त रमत असे.

## युवराजाची आध्यात्मिक क्षुधा

इ. स. १६२७ साली जहांगीरच्या मृत्यूनंतर शहाजहान गादीवर आला. आणि दारा शुको याला यौवराज्यपद प्राप्त झाले. युवराजाला न्यायदानाचे काम व्यवस्थित करता यावे आणि राजकारण कळावे म्हणून शहाजहान त्याला दरबारात नेहमी आपल्या शेजारी बसवत असे. पण कायद्याच्या भानगडीत दाराचे क्वचितच लक्ष असे. मुसलमानी कायद्याचा अभ्यास तर त्याने कधीच केला नाही. दरबारी कामकाजाच्या या औदासिन्यामुळे दाराला पुढे फार त्रास झाला आणि शेवटपर्यंत माणसांची पारख न करता आल्यामुळे त्याची व्यवहारात फसगत होत गेली. जन्मजात आध्यात्मिक ज्ञान-पिपासा तृप्त करणारा कुणी भेटतो का इकडेच दाराचे लक्ष असे. त्यावेळचे कादिरिया पंथाचे लाहोर येथील सुप्रसिद्ध साधु मियाँ मिर् यांच्याकडे दारा पहिल्याप्रथम आकृष्ट झाला. पण या सत्पुरुषाचा सहवास थोडाबहुत लाभतो न लाभतो तोच त्यांनी महासमाधी घेतली. आणि त्यामुळे दाराची स्थिती आधार सुटलेल्या माणसासारखी झाली. मियाँ मिर् यांच्या महाप्रयाणानंतर दारा योग्य गुरुसाठी तळमळत होता. याच सुमारास त्याने "शफिनत-उल्-अवलिया' म्हणजेच 'इस्लामी साधुसंतांचे चमत्कार' हा ग्रंथ लिहिला. त्यात मुख्यत: मियाँ मिर् यांचे चरित्र आणि त्यांच्या उच्चतम आध्यात्मिक अनुभवांचे संकलन आढळून येते. यावेळी दाराचे वय अवघे २४ वर्षांचे होते. इतक्या अल्पवयात लिहिलेल्या या ग्रंथातही त्याच्या सुफीपंथीय तत्त्वज्ञानाच्या सखोल अभ्यासाची प्रचीती येते. दाराच्या मनावर या पंथातील आध्यात्मिक तत्त्वांची पकड पूर्णपणे बसली होती. 'इत्तिहाद्' म्हणजे ईश्वरी एकत्त्वाचा साक्षात्कार होणे आणि 'तौहीद' म्हणजे दृश्यमान विविधतेत एकत्त्वाचे दर्शन होणे. 'मी' चा पूर्ण निरास होऊन 'तू' चेच सर्वत्र ज्ञान होणे हीच या पंथानुसार मानवी जीवनाची इतिकर्तव्यता होय. शाह दिलरुबा या सूफी सत्पुरुषाला दाराने वेळोवेळी लिहिलेली पत्रे उपलब्ध आहेत. त्यात आपण सूफी तत्त्वानुसार विकसित होत असलेल्या दाराच्या आध्यात्मिक जीवनाची वेगवेगळी प्रतिबिंबे पाहू शकतो.

इ. स. १६४० मध्ये दारा शहाजहानबरोबर काश्मीरला गेला होता. यावेळी मियाँ मिर् यांचा शिष्य मौलाना शाह बदख्शी यांच्याशी दाराचा निकट संबंध आला होता. तसे पाहिल्यास अकबरा-पासून या राजघराण्यात ख्वाजा मुईनुद्दीन चिश्ती यांनी प्रस्थापित केलेल्या पंथाचीच गुरुगिरी चालत आली होती. दाराची बहीण जहाँ आरा हिनेही या पंथाची दीक्षा घेतली होती. 'मूनिस्-उल्-अर्वाह' या नावाचा ख्वाजाच्या चरित्रपर असा एक ग्रंथही जहाँ आरेने लिहिला होता. खुद्द दाराही काही दिवस मुइनुद्दीनच्या पंथाची दीक्षा घ्यावी की कादिरिया पंथात समाविष्ट व्हावे याविषयी संदिग्ध होता. पण अखेरीस मियाँ मिर् व मौलाना शाह बदख्शी यांच्या व्यक्तिमत्त्वाने प्रभावीत होऊन दाराने कादिरिया पंथच स्वीकारला.

## दाराची साहित्यिक कामगिरी

दाराची साहित्यिक कामगिरी आणि त्याचा वैयक्तिक आध्यात्मिक विकास परस्परसापेक्ष आहे. आध्यात्मिक तत्त्वांचे विवेचन हीच ईश्वरोपासना अशी दाराची धारणा होती. 'तौहीद्'– चे तत्त्व (दिव्य ऐकात्म्य) पाण्याप्रमाणे स्वत: निर्गुण निराकरा







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असून उपाधीनुसार त्याला वेगवेगळा आकार व रंग येतो आणि म्हणूनच वेगवेगळ्या धर्मात ईश्वराचे एकच स्वरूप भिन्न भिन्न भासते अशी त्याची धारणा होती. हेच सनातन सत्य लोकांना सांगण्याकरिता दाराने आपली लेखणी उचलली. मानवजातींमध्ये उफाळत असलेल्या कलहाग्नीवर ह्या 'तौहीद्' च्या अमृतमय तत्त्वाचा वर्षाव करणे हे दाराने आपले परम कर्तव्य मानले. आणि इस्लामच्या भव्य कपाळावर लागलेला संकुचितपणाचा कलंक पुसून टाकून त्याच्या खऱ्या स्वरूपाला उजळा दिला.

दाराच्या साहित्यिक कारकीर्दीचे दोन कालखंड पडतात. पहिला इ. स. १६४० ते १६४७ पर्यंत व दुसरा इ. स. १६४८ ते १६५७ पर्यंत. पहिल्या कालखंडात 'शफिनत-उल्-अवलिया' आणि 'रिसालए हकनुमा' हे दोन ग्रंथ लिहिले. या दुसऱ्या ग्रंथात 'आलम् चे म्हणजे आध्यात्मिक विकासाच्या चार पातळींचे, चार प्रकरणात संपूर्ण विवेचन आहे. मुळात हा ग्रंथ चार प्रकरणांचाच होता पण पुढे 'सत्य व त्याचे स्वरूप' या विषयावरील दोन प्रकरणे दाराने या ग्रंथाला जोडली. या पहिल्या कालखंडात दाराचे सर्व लक्ष सूफी मतातील अनेकेश्वरवादी पंथांकडे लागले होते. दुसऱ्या कालखंडात दाराने ज्यू, ख्रिश्चन व हिंदू या धर्मांचा तुलनात्मक अभ्यास केला. या धर्मातील अंतर्गत विचारप्रवाह इस्लामी धर्माशी कितपत जुळतो ते त्याने ताडून पाहिले. याच सुमारास सर्मद नावाच्या एका ज्यू साधूचे शिष्यत्व दाराने पत्करले. सर्मदचे वास्तव्य त्याचा पट्टशिष्य अभीचंद याच्या घरी होते. अभीचंदाने मोझेसच्या गॉस्पेलातील काही भागांचा पर्शियनमध्ये 'तर्जुमा' केला होता. ह्या भाषांतरावरून दाराला जुन्या करारातील बरीचशी माहिती मिळाली होती. त्याकाळी आग्रा हे जेसुईट लोकांच्या प्रचाराचे केन्द्र होते. आणि बरेचसे ख्रिस्ती धर्मोपदेशक दाराच्या भेटीस येऊन धर्मचर्चा करीत असत. मनुक्की नावाचा इतिहासकार लिहितो की हे ख्रिस्ती धर्मोपदेशक ॲरिस्टॉटलच्या तर्कशास्त्राद्वारे एतद्देशीय पंडितांची बाजू उलटवीत; तेव्हा दाराला मोठी गंमत वाटे.

इस्लामी धर्म भारतात येण्यापूर्वीच कित्येक मुस्लिम विचारवंतांवर हिंदु तत्त्वज्ञानाचा प्रभाव पडला होता. अकराव्या शतकातील अल्बेरुनी व सोळाव्या शतकातील अबुल फजल यांनी षड्दर्शनाविषयीचे बरेचसे साहित्य मुसलमानी जनतेला मिळवून दिले होते. अकबराच्या काळात वाङ्मयीन पुनरुज्जीवन सुरू झाले. आणि तेव्हापासून बरेचसे विद्वान मुसलमान संस्कृत वाङमयात व हिंदूधर्मात लक्ष घालू लागले होते. खुद्द अकबरानेही रामायण महाभारत व अथर्ववेद यांचे भाषांतर करवून आपल्या मुसलमान बांधवास हिंदुधर्माचे सर्वसामान्य ज्ञान प्राप्त करून देण्याचा प्रयत्न केला. पण मुसलमानी जनतेला ही भाषांतरे विशेष रुचकर वाटली नाहीत. रामायण-महाभारतातील रूपके आणि त्यातील नीतिपर कल्पना त्यांना विशेष उमगल्या नाहीत. दाराने मात्र हिंदुतत्त्वज्ञानाच्या अगदी मूळ झऱ्यासच हात घातला आणि तेथील शुद्ध जीवन ज्ञानपिपासू मुसलमानी जनतेस मिळेल अशी व्यवस्था केली.

हिंदुधर्माचे सारसर्वस्व असलेला 'श्रीमद्भगवद्गीता' हा ग्रंथ दाराने पर्शियनमध्ये अनुवादित केला. गीतेतील अमृततुल्य तत्त्वज्ञानाचे आकंठ पान केल्यावर दाराचे लक्ष 'सर्वोपनिषदो गावः' अशा गायींकडे वळले. आणि दूध पिऊन संतृप्त झालेले वासरू जसे आपल्या आईच्याभोवती आनंदाने उड्या मारीत घोटाळते, अंगाखांद्याशी उगाच ढुसण्या मारते तशी दाराची स्थिती झाली. आतापर्यंत दाराने जो अभ्यास केला होता, साधुसंतांच्या जीवनाचे जे निरीक्षण केले होते, त्यातील अर्थ उपनिषदांच्या मननाने हळूहळू दाराच्या चित्तात उलगडत गेला. अनेकविध साधूंच्या चरित्रात मधून मधून लख्कन चमकणाऱ्या उज्वल अनुभूतींचे हृदयंगम असे चित्रण औपनिषदिक वाङमयात दाराला पाहावयास मिळत होते. अशा या औपनिषदिक ज्ञानाची पावन गंगा दाराने अनेक पंडितांना हाताशी धरून पर्शियन वाङमयात आणून सोडली. या पर्शियन गंगेचाच एक प्रवाह, ॲक्वेटिल ड्यू पेरॉन या नावाच्या कुणा एका इसमाने, लॅटीन भाषेच्या द्वारा यूरोपकडे वळविला. आणि याच प्रवाहातील निर्मळ पाणी पिऊन शॉपेन हॉरसारखा तत्त्वज्ञानी हरखून गेला. आणि म्हणाला –

" In the whole world, there is no study so beautiful and so elevating



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

as that of the 'Oupnekhat.' It has been the solace of my life – it will be the solace of my death."

शॉपेन हॉरने अशी मुक्तकंठाने उपनिषदांची प्रशंसा केल्यानंतर मग कोलब्रूक, कॉवेल, रेग्नॉड, बृथलिंक्त आणि वेबर यांनी प्रस्तुत ग्रंथांची इंग्लिश, फ्रेंच, जर्मन इत्यादी भाषेत भाषांतरे केली.

वर उल्लेखिलेली सारी वाङ्मयनिर्मिती दाराने स्वतः केली होती. आता दारा हा संस्कृताचा वैय्याकरण पंडित नव्हता आणि म्हणून वरील भाषांतराच्या कामी त्याला बरेचदा साहाय्यक पंडितांवर अवलंबून बसावे लागे. पण एकदा अभिप्रेत अर्थ लक्षात आला की, मग दारा, पर्शियनमध्ये त्याचे असे घाटदार रूपांतर करी की ते मूळच्या इतकेच सरस दिसे. उपनिषदांचे हे पर्शियन भाषांतर अत्यंत सुंदर वठलेले आहे याची ग्वाही पर्शियन जाणणारे संस्कृतज्ञ आजही देतात. दाराने इतरही बरेच धर्मपर साहित्यलेखन केले होते. दाराच्या खास आश्रयाखाली उल्लेखनीय अशा दोन ग्रंथांची भाषांतरे झाली. एक म्हणजे 'प्रबोधचंद्रोदय' नावाचे वेदान्तपर नाटक व दुसरे योगवासिष्ठ. पैकी पहिले मुन्शी बनवालीदास यांनी केले असून दुसरे मुल्ला महम्मद यांनी केले होते.

## शोकास्पद अंत

स्वतःचे तसेच इतरांचे जीवन समृद्ध व विकसित करणाऱ्या या राजपुत्राचा अंत फार शोकजनक रीतीने झाला. शहाजहानची प्रकृती ढासळू लागल्याबरोबर दाराव्यतिरिक्त त्याचे सर्व पुत्र सिंहासन बळकावण्याच्या मागे लागले व कावेबाज औरंगजेब या कामी यशस्वी झाला. त्याने बापाला कैदेत टाकले आणि दारा ज्येष्ठ राजपुत्र म्हणून त्याला पकडण्याचा हुकूम सोडला. मलिक् जीवन नावाच्या ज्या एका सरदाराला दाराने शहाजहानकडून जीवदान देवविले होते तोच दारावर उलटला. आणि आपल्या मुलासह आश्रयासाठी आलेल्या दाराला त्याने औरंगजेबाच्या स्वाधीन केले. सर्वधर्मसमन्वयासाठी आजन्म झटणारा दारा धर्मवेड्या औरंगजेबाच्या हाती पडताच जे व्हायचे तेच झाले. दाराचे ईश्वरविषयक उदात्त विचार औरंगजेबाला अनाकलनीय होते. दाराच्या अंगठीवर 'प्रभु' ही दोन अक्षरे देवनागरीत कोरलेली असणे हा तर औरंगजेबाच्या मते शुद्ध हिंदुपणा होता. असल्या माणसाला जिवंत ठेवण्यात औरंगजेबाच्या मते इस्लामला खतरा होता. पवित्र धर्माच्या रक्षणासाठी (आणि राजकीय सुरक्षिततेसाठी) दाराला जिवंत ठेवणे योग्य नाही अशा अर्थाची चर्चा होऊन ओल्मा (धर्मगुरु) व काजी (न्यायाधीश) यांच्या स्वाक्षरीसह दाराच्या देहान्त शिक्षेचा फतवा (जाहीरनामा) काढण्यात आला.

देहान्त शिक्षेच्या आदल्या दिवशी दाराची, त्याच्या मुलासह, लष्करी बंदोबस्तात एका अस्थिपंजर झालेल्या हत्तिणीवरून धिंड काढण्यात आली. दाराच्या अंगावर एक फाटकी शाल पांघरायला देण्यात आली होती. मिरवणूक राजरस्त्यावरून जात असता, दुतर्फा लोकांच्या झुंडीच्या झुंडी अश्रू गाळीत औरंगजेबाला शिव्याशाप देत होत्या. इतक्यात रस्त्यावरील एक वृद्ध भिकारी ओरडला – "हाय रे दैवा! दारा, तू राजपुत्र होतास तेव्हा या रस्त्याने जाताना मला नेहमी भिक्षा द्यायचा! आता मी कुणाला मागू!" दाराने इतका वेळ खाली घातलेली मान वर करून एकदा त्या भिकाऱ्याकडे आर्त दृष्टीने पाहिले. आणि अंगावरील ती शाल त्याच्याकडे टाकून जवळजवळ उघडाच असा तो पुन्हा खाली मान घालून बसून राहिला.

दुसऱ्या दिवशी (३० ऑगस्ट १६५९) औरंगजेबाने नजर बेग नावाच्या आपल्या विश्वासू गुलामास जवळ बोलावून दाराचे शिर आणण्याची आज्ञा केली, आणि मोगल साम्राज्योद्यानातील उत्कृष्ट 'गुलाबपुष्प' कुस्करून टाकले.

## सहाय्यक ग्रंथ


(1) 'Anecdotes of Aurangzib' (with a life of Aurangzib and Historical notes) – By Janunath Sarkar.

(2) 'A Short History of Aurangzib' – By Janunath Sarkar.

(3) Cambridge History of India (Vol. IV)

(4) The Crescent in India (A study in Medieval History) – By S. R. Sharma.










अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. वि. वि. भिडे

# मनोहरदास निरंजनी--

## एक अप्रसिद्ध हिन्दी कवि *

भारतामध्ये वेगवेगळ्या ग्रंथालयांमध्ये हस्तलिखितांचा मोठा संग्रह झालेला असला, तरी अद्यापि खेडेगावांमधून अनेक घरांमध्ये लक्षावधी हस्तलिखिते पडून आहेत. त्यांची माहिती काढून ती हस्तलिखिते मिळवून त्यांचा संग्रह करणे हेही काम फार महत्त्वाचे आणि निकडीचे आहे. अनेक हस्तलिखितांची ठिकठिकाणी दुरवस्थाच पहायला मिळते. पुणे येथील वैदिक संशोधन मंडळाने पोथ्यांचा संग्रह करण्याचे प्रयत्न सुरू केले आहेत. मंडळाच्या वतीने पोथ्या गोळा करण्याकरिता रत्नागिरी जिल्ह्यातील गोळप या गावी नुकताच गेलो होतो. आणि तेथून हस्तलिखितांचा मोठा संग्रह मंडळाच्या ग्रंथालयात आणला आहे. त्यांमध्ये पाच सहाशेहून अधिक हस्तलिखित पोथ्या आहेत. बहुतेक पोथ्या संस्कृतमध्ये आहेत. आणि त्यात वेद, श्रौत, स्मार्त, वेदान्त, व्याकरण, पुराण इत्यादी विविध विषयांवर अनेक दुर्मिळ पोथ्या आहेत. या पोथ्या चाळत असता, प्राकृत भाषेत लिहिलेल्या काही पोथ्या आढळल्या आणि त्यामध्ये 'मनोहरदास निरंजनी' याच्या नावावर सहा पोथ्या आढळल्या त्यांची नावे अशी : (१) शतप्रश्नी, (२) षट्प्रश्नी (३) ज्ञानचूरणवचनिका (४) ज्ञानमंजरी (५) वेदान्तमहावाक्य (६) वेदान्त पंचीकरण.

वरील सर्व पोथ्या एकाच हस्ताक्षरात असून, प्रत्येक पोथीच्या शेवटी लेखकाने आपले नाव व लेखनकाल दिला आहे. ' 'वामन नारायण गद्रे, गुहागरकर' असे पोथीमध्ये लेखक आपले नाव देतो. आणि लेखनकाल शके १८०३ असे देतो. लेखन वडोद्यास केल्याचाही उल्लेख प्रत्येक पोथीच्या शेवटी लेखकाने केला आहे. पोथीत शब्द तोडलेले दिसतात. प्रत्येक पोथीच्या शेवटी 'मनोहरदास निरंजनीकृत' असे म्हटलेले आहे तेव्हा हा मनोहरदास कोण? कोठला? त्याचा काळ कोणता? इत्यादी संबंधी जिज्ञासा उत्पन्न झाली.

### नामसादृश्य

मनोहरदास निरंजनीसंबंधी काही माहिती मिळते का हे पहाण्यासाठी "हिन्दी-जैन भक्तिकाव्य और कवि" हे पुस्तक चाळले. त्यात पं. मनोहरदास सं. १७०५-१७२८) या नावाच्या एका जैन कवीचा उल्लेख आहे. त्यांच्या नावावर असलेल्या ग्रंथांचीही थोडीबहुत माहिती दिली आहे. परंतु मनोहरदास निरंजनीच्या वर उल्लेखिलेल्या ग्रंथांपैकी एकाचेही नाव त्यात नाही. शिवाय पं. मनोहरदास हा जैन मताचा दिसतो; तर मनोहरदास निरंजनी हा जैनेतर मताचा दिसतो. त्यामुळे त्या दोघांचे साम्य वाटत नाही. "चैतन्यमत और व्रजसाहित्य" या पुस्तकातही एक मनोहरदास आहे. पण तो चैतन्यमताचा अनुयायी असल्याचे म्हटले आहे. "हिन्दी साहित्यका इतिहास" या ग्रंथात मनोहर कवि (संवत् १६२०) याच्या 'शतप्रश्नोत्तरी' या ग्रंथाचा उल्लेख आहे. मनोहरदास निरंजनीच्या 'शतप्रश्नी' या ग्रंथाशी त्याचे केवळ नामसादृश्य दिसते. शिवाय मनोहरदास निरंजनी स्वतःचा काळ संवत् १७१६ देतो. त्यामुळे मनोहरदास निरंजनी हा मनोहर कवीहून भिन्न आहे, असे दिसते.

"खोजमें उपलब्ध हस्तलिखित हिन्दी ग्रंथोंका विवरण" या नावाने श्री. पीताम्बर दत्त बडथ्वाल आणि अन्य विद्वानांनी वेगवेगळे रिपोर्ट प्रसिद्ध केले आहेत. त्याच्या १३ व्या त्रैवार्षिक (संवत् २०१०) रिपोर्टमध्ये मनोहरदास या नावाच्या एका ग्रंथकाराचा उल्लेख असून त्याच्या 'फूल चरित्र' या ग्रंथाचा उल्लेख आहे. परन्तु तो मनोहरदास निरंजनीहून वेगळा असावा, असे दिसते. या रिपोर्टात मनोहरदास निरंजनीचा उल्लेख आढळला नाही.

### निरंजनी संप्रदाय व मनोहरदास निरंजनी

मनोहरदास निरंजनी असे ग्रंथकाराने स्वतःचे नाव दिले आहे. त्यावरून हा निरंजनी संप्रदायातला

* भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे याच्या ५७ व्या वाढदिवसानिमित्त दिनांक ८ जुलै १९६७ रोजी झालेल्या सभेत प्रस्तुत निबंध वाचला.









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असावा हे उघड दिसते. निरंजनी संप्रदायाचे प्रवर्तन निरंजन भगवान् या संताने केले आहे. या संप्रदायाचा उगम ओरिसात झाला असून, त्याचा प्रसार सर्व भारतभर नंतरच्या काळात झालेला दिसतो. 'भक्त माल' या आपल्या ग्रंथात राघवदासाने निरंजनी संप्रदायातील प्रसिद्ध बारा शिष्यांची नावे दिली आहेत त्यामध्ये मनोहरदासाचे नाव नाही. परंतु या प्रसिद्ध बारा शिष्याशिवाय इतर संतांची जी नावे दिली आहेत, त्यामध्ये मनोहरदासाचे नाव आहे. परंतु 'भक्तमाल' हा ग्रंथ संवत् १७०० पूर्वीचा असल्यामुळे त्यामध्ये असलेला मनोहरदास हा वेगळा असावा. निरंजनी संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाच्या प्रसारा-साठी त्याने हे ग्रंथ लिहिले असले पाहिजेत; असे दिसते. परंतु त्याच्या ग्रंथात मिळणाऱ्या माहितीवरून त्याच्या चरित्रावर काही प्रकाश पडू शकेल काय हे पाहिले पाहिजे.

## मनोहरदासाचे ग्रंथ

(१) **शतप्रश्नी**:– या पोथीची पाने ३६ आहेत. यामध्ये आध्यात्मिक विषयासंबंधी प्रश्नोत्तर रूपाने विवेचन केलेले आहे. " इति श्री शतप्रश्नोत्तरी भाषायां अष्टमं खण्डम् समाप्तम् ॥ याप्रमाणे प्रत्येक खंडाच्या शेवटी नोंद आहे. एकूण ९ खण्ड आहेत. पृ. २२ वर " (प्रश्न) सबके देवता कौन ॥ उत्तर ॥ दिक् वात रवि वरुण पृथ्वी । अग्नि इन्द्र, उपेन्द्र, प्रजापति, मृत्यू चन्द्र ब्रह्मा, रुद्र ॥ इति देवता " असा उल्लेख आहे. तर दुसऱ्या संदर्भात ब्रह्मा, विष्णु, रुद्र, शिव व सदाशिव यांचा उल्लेख आहे. प्रस्तुत ग्रंथात ग्रंथ-काराने स्वतःचा उल्लेख केलेला आढळत नाही.

(२) **षट्प्रश्नी** :– या पोथीची पाने ९३ आहेत. ग्रंथारंभी इष्टदेवतेला नमस्कार आहे. इष्टदेवता आणि गुरु यांचा अभेद मानून, गुरुलाही नमस्कार आहे. " ग्रंथकरता गुरुकुभी । इष्टदेवतासु अभेद करिके ग्रंथकी विघनता दुर करी बेकू ॥ " परंतु गुरूच्या नावाचा निर्देश आढळत नाही. या ग्रंथात ब्रह्म, ओंकाराची उत्पत्ति, जीवब्रह्मैक्य, इत्यादी विषयांवर प्रश्नोत्तर रूपाने विचार केलेला दिसतो. शेवटी " इति श्री षट्प्रश्नीनीरनेनामभाषा ग्रंथ मनोहरदास निरंजनी कथिते संपूर्ण समाप्तम् ॥ असा उल्लेख आहे. ग्रंथकाराने स्वतःचा उल्लेख मूळग्रंथात केलेला दिसत नाही.

(३) **ज्ञानचूरणवचनिका** :– ग्रंथाची पाने ३२ आहेत. ग्रंथाच्या नावाचा उल्लेख करताना कवि लिहितो. " भाषा ग्रंथ यह वचनिका । ओषध चूरन सोई । ज्ञानचूरन यह वचनिका । नाम जुयाको होई ॥ तप्त नीर चूरन भखे । उद्ररोग सब जाया सोसाधन सहित विचारते । संसार रोग न साय ॥"

शेवटी ग्रंथकार स्वतःच्या नावाचा उल्लेख करतो, " कहे मनोहरदास निरंजनी । यह निश्चें निरधार ॥ ग्रंथाच्या आरंभी सूर्य व आपला गुरु यांचा उल्लेख करून त्यांना ग्रंथकाराने वंदन केले आहे. तो म्हणतो–

" रवि गुरु सम तुल्य ज्यौं । तम अज्ञान करे दूर ।
जग उरमें प्रकाश करि । वंदन कौं निजमूर । "

(४) **ज्ञानमंजरी** :– पोथीची पाने ३२. चार प्रकारच्या मनुष्यांचे वर्णन करून ग्रंथाच्या विवेचनास प्रारंभ केलेला आहे.

" प्रथम मुक्त कही । दुसरे मुमुक्षी सोऊ ।
तीसरो विषई । चौथो पामर विचारो हे ।
च्यार पुरुष संसार मांझ । कहे निरधार ॥ "

वेदांमध्ये कर्म, उपासना व ज्ञान यासंबंधी तीन कांडे आहेत. परंतु मुक्तीसाठी विवेचनात्मक कांड नाही, असे ग्रंथकाराने म्हटले आहे. ग्रंथाच्या शेवटी स्वामी व दास यांचे ऐकात्म्य दाखवून ग्रंथकाराने स्वतःचा उल्लेख केला आहे. –

" मनोहरदास निरंजनी । सो स्वामी सो दास ।
स्वामीदासभय एकसो । महाकाश घटाकाश ॥ "

(५) **वेदान्तमहावाक्य** – पोथीची पाने २९ आहेत. ग्रंथारंभी गणेश, सरस्वती, महेश व पारवती यांना मंगल देण्याची प्रार्थना केली आहे. यात प्रश्नो-त्तर रूपानेच तत्त्वज्ञानाची मांडणी केलेली आहे. 'सदेव सोम्य इदमग्र आसीत्', यतो वा इमानि भूतानि जायन्ते। येन जातानि जीवन्ति', सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' इत्यादी उपनिषद् वाक्यांचा निर्देश करून त्यांच्या अर्थाचे विवेचन ग्रंथकाराने सोप्या भाषेत केले आहे. त्याचप्रमाणे तत् त्वम् असि या महावाक्याच्या अर्थाचे विवरणही केले आहे. ग्रंथकार म्हणून स्वतःचा उल्लेख करताना तो लिहितो –

" मनोहरदास निरंजनी । करी सो भासा सार ।
थोरीसी विस्तार नहीं । अर्थ सबे विस्तार ॥






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या ग्रंथांच्या रचनाकाळाचा उल्लेख त्याने पुढील दोह्यात केला आहे —

"संवत सत्रासें मही । सोरह वरसबतीत ।
वृपसत्रेहे सोमही करी । षटमासताहीवतीत ।
आसो वद चतुर्दसि । कृष्ण पक्ष सनीवार ।
भाषा पुरण सब भई । मास एक कतकार ।।"

यावरून त्याच्या रचनाकाळाविषयी माहिती मिळते ती अशी – संवत् १७१६ अतीत, आश्विन वद्य चतुर्दशी, शनिवार. परंतु संवत् १७१६ मधील वरील तिथी जुळत नाही. संवत् चैत्रादि व मास पूर्णिमान्त धरून संवत् १७१७ मधील आश्विन वद्य चतुर्दशी शनिवारी येते. परंतु त्यादिवशीही दुपारी १२ नंतर चतुर्दशी लागते. ही तिथी प्रमाण म्हणून घेतल्यास ही तारीख २२ सप्टेंबर १६६० अशी येते.

(६) **वेदान्तपंचीकरण–** पोथीची पाने १२ आहेत. पृथिवी, आप, तेज, वायु व आकाश या पंचमहाभूतांच्या परस्पर संबंधीच्या तत्त्वज्ञानाचा विचार यामध्ये केलेला दिसतो. ग्रंथांतील ग्रंथकार स्वतःच्या नावाचा उल्लेख करीत नाही.

वर उल्लेखिलेल्या सहाही ग्रंथांच्या भाषेचा विचार करता ही भाषा फार प्राचीन हिंदी असावी, असे दिसत नाही. भाषा अत्यंत सुबोध आहे. त्याच्या भाषेवर अवधी, व्रज, राजस्थानी इत्यादी भाषेतील शब्दशैलीचा प्रभाव असल्याचे स्पष्ट दिसते.

## पुणे विद्यापीठातील ग्रंथ

निरंजनी संप्रदायासंबंधी पुणे विद्यापीठात असलेल्या पोथ्यांची माहिती डॉ. भगीरथ मिश्र यांनी आपल्या "निरंजनी संप्रदाय और संत तुरसीदास निरंजनी" या पुस्तकात दिली आहे. त्यामध्ये पृष्ठ १६-१७ वर मनोहरदास निरंजनीच्या नावावर असलेल्या ग्रंथांची माहिती दिली आहे. श्री. अगरचंद नाहटा यांनी 'सप्तसिंधू' च्या अंकात (नोव्हेंबर १९६२) मनोहरदास निरंजनीची जी माहिती दिली आहे, तिचा उल्लेख करून डॉ. भगीरथ मिश्रांनी मनोहरदास निरंजनीच्या अप्रकाशित सात ग्रंथांचा उल्लेख केला आहे. त्यांची नावे अशी (१) ज्ञानमंजरी (२) वेदान्तमहावाक्य (३) ज्ञानचूर्णवचनिका (४) शतप्रश्नोत्तरी (५) षट्प्रश्नी निर्णय (६) ध्यानभूमिका (७) वैराग्यवृंद. यांपैकी 'ध्यानभूमिका' ग्रंथाचा उल्लेख श्री. नाहटांनी केला असून इतर सहा ग्रंथ पुणे विद्यापीठात हस्तलिखित स्वरूपात असल्याचे डॉ. मिश्राजींच्या पुस्तकावरून वाटते. पुणे विद्यापीठातील हस्तलिखिते प्रत्यक्ष पहाण्यासाठी गेलो असता हिंदी हस्तलिखितांची वर्णनात्मक सूची पहावयास मिळाली. तीमध्ये (१) शतप्रश्नोत्तरीभाषा (२) षट्प्रश्नीनिर्णय (३) ज्ञानचूरन बचनिका, व (४) ज्ञानमंजरी असे चारच ग्रंथ मनोहरदास निरंजनीच्या नावावर असल्याची माहिती मिळाली. त्यांच्या पृष्ठसंख्येचा व इतर वर्णनाचा विचार करता वर वर्णन केलेल्या हस्तलिखितांपेक्षा हे ग्रन्थ वेगळे असावे असे दिसते. कारण पुणे विद्यापीठातील या हस्तलिखितात पृष्ठसंख्या अगदी थोडी आहे. तेव्हा विद्यापीठातील हस्तलिखित ग्रंथ व वैदिक संशोधन मंडळात संग्रहित केलेले ग्रंथ यांचे तौलनिक अध्ययन करून मनोहरदास निरंजनीच्या तत्त्वप्रणालीचा अभ्यास करणे आवश्यक आहे.

वरील ग्रंथांच्या स्थूल अभ्यासावरून ही गोष्ट स्पष्ट होते की, मनोहरदास निरंजनी हा वेदान्त तत्त्वज्ञानाचा मोठा पंडित असावा. उपनिषदांच्या अभ्यासातून आध्यात्मिक विचारांचा प्रसार त्याने प्राकृत भाषेत केला आहे. चौपाई, दोहे इत्यादी तत्कालीन छंदांचा त्याने वापर केलेला आहे. ब्रह्मा, विष्णु, रुद्र, इंद्र इत्यादी वैदिक तसेच पौराणिक देवतांचा उल्लेख त्याने आदराने केलेला दिसतो. निरंजनी संप्रदायातील कित्येक संतांनी कर्मकाण्डाचा निषेध करून आध्यात्मिक तत्त्वज्ञानावरच भर दिला आहे. त्याप्रमाणेच मनोहरदास निरंजनीच्या ग्रंथांमध्येही आध्यात्मिक तत्त्वज्ञानाचाच विचार अधिक केलेला आहे. निरंजनी संप्रदायात मनोहरदासाचे स्थान काय याचा विचार होणे अवश्य आहे. प्रस्तुत मिळालेल्या हस्तलिखित ग्रंथांच्या सूक्ष्म अध्ययनातून त्याच्या चरित्रावर आणखी प्रकाश पाडणे शक्य आहे असे वाटते.



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. वा. के. लेले

# ' व्यासदास ' हे क्षेमेन्द्राचे आडनाव काय ?

( १ ) बहुसंख्य प्राचीन संस्कृत कवींच्या चरित्राविषयी निश्चित व साधार माहिती मिळत नाही ही बाब सर्व अभ्यासकांच्या चांगली परिचयाची आहे. ते कवी कोठे जन्मले, त्यांची खरी नावे काय होती, त्यांच्या मातापित्यांची नावे काय होती, त्यांच्या पूर्वजांचे व्यवसाय कोणते होते, त्यांचे शिक्षण कोणत्या गुरूंच्या हाताखाली व कसे झाले, त्यांचे प्रापंचिक जीवन कसे होते, त्यांचा मित्र-परिवार किती मोठा व कोणत्या स्वरूपाचा होता इत्यादी तपशीलासंबंधी प्रायः अज्ञानच आहे. वस्तुस्थिती अशी असताना डॉ. दे व डॉ. कृष्णम्माचारियर हे दोघे आधुनिक पण्डित जेव्हा औचित्यविचारचर्चाप्रभृती प्रख्यात संस्कृत ग्रंथांचा कर्ता जो क्षेमेन्द्र त्याचे ' व्यासदास ' हे आडनाव असल्याचे प्रतिपादन करतात; तेव्हा चिकित्सकाच्या मनात साहजिकपणेच कुतूहल निर्माण होते व ह्या दोघा विद्वानांची एतद्विषयक विचारसरणी पारखून पाहाण्याची बुद्धी होते. त्याच भावनेने प्रेरित होऊन प्रस्तुत लेख लिहिला आहे.

( २ ) प्रथमतः डॉ. दे ह्यांनी ' व्यासदास हे क्षेमेन्द्राचे आडनाव होय ' असे कोठेकोठे म्हटले आहे ते विचारात घेऊ. डॉ. दे ह्यांनी पुढील स्थळी क्षेमेन्द्राच्या व्यासदास ह्या (तथाकथित) आडनावाचा उल्लेख केला आहे-

( अ ) " This hard-working polymath, *surnamed Vyāsadāsa*, was the son of Prakāsendra and grandson of Sindhu[१] ...

( आ ) " ... polygrapher Kṣemendra, with *the surname Vyāsadāsa*, is notable in Sanskrit Poetics. "[२].

(इ) "It is worth noting, however, that while *Kśemendra's surname Vyāsaāsa* is given in all his works ( with the exceptian of his Kalāvilāsa )..." [३]

व्यासदास हे क्षेमेन्द्रांचे surname होय ही जशी डॉ. दे यांची धारणा आहे तशीच ती डॉ. कृष्णम्माचारियर यांचीही आहे. त्यांचे पुढील विधान ह्याबाबतची साक्ष पटविण्यास पुरेसे आहे--

" *Kṣemendra surnamed Vyāsadāsa,* was the son of Prakāśendra and grand-son of Sindhu... " [४]

(३) वरील चारही अवतरणांवरून हे स्पष्ट होते की, व्यासदास हे क्षेमेन्द्राचे surname होय ह्याविषयी डॉ. दे व डॉ. कृष्णम्माचारियर ह्या दोघा विद्वानांच्या मनात संदेह नाही. त्यांच्या ह्या मताची परीक्षा करण्यास प्रारंभ करण्यापूर्वी एक शंक ।मनात उत्पन्न होते, ती अशी की, ह्या दोघा विद्वानांनी surname हा शब्द नेमका कोणत्या अर्थाने वापरला आहे ? surname शब्दाचा प्रसिद्ध व प्रचलित अर्थ

१. Dr. S. N. Dasgupta and Dr. S. K. De - A History of Sanskrit Literature, Classical Period, Volume I, Calcutta, second edition 1662, p. 404.

२. Dr. S. K. De- History of Sanskrit Poetics, Vol. I, Calcutta, 1960, p. 129.

३. Ibid, p. 131.

४. Dr. M. Krishnamachariar-History of Classical Sanskrit Literature, Madras, 1937, p. 170.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आडनाव ( संस्कृत भाषेत आडनावालाच उपनाम किंवा उपाख्या म्हणतात. ) हा आहे हे खरे. तथापी, वरील दोघा विद्वानानी त्याच अर्थाने हा शब्द वापरला आहे का ? असल्यास तद्विषयक प्रमाण ( किंवा गमक ) कोणते ? ह्या विद्वानांनी surname शब्द आडनाव ह्या प्रचलित अर्थाहून भिन्न अर्थाने वापरला असल्यास त्यांची भूमिका तपासून पाहाण्यासाठी भिन्न कसोटी अवलंबावी लागेल, हे उघड आहे. म्हणूनच, ह्या विद्वानांनी आपापल्या ग्रंथामध्ये surname हा शब्द आणखी कोठे व कोणत्या संदर्भात वापरला आहे ते पाहणे अगत्याचे ठरते. surname शब्दाचा ह्या दोघा विद्वानांना अभिप्रेत असलेला अर्थ निश्चित करण्याचे हेच एक विश्वसनीय गमक होय. म्हणून असे निर्देश प्रथमतः विचारात घेऊ.

डॉ. कृष्णम्माचारियर ह्यांनी क्षेमेन्द्राखेरीज दुसऱ्या कोणत्याही कवीच्या surname चा उल्लेख आपल्या ग्रंथात केलेला आढळत नाही. तथापी, डॉ. दे ह्यांनी मात्र आणखी बऱ्याच कवींची surnames दाखल केलेली आढळून येतात. उदाहरणार्थ, त्यांच्या मतानुसार वल्लभ हा जो रुद्रटकृत काव्यालङ्कार नामक ग्रंथाचा टीकाकार होऊन गेला, त्याचे surname ‘ परमार्थचिह्न ’ असे होते.[१] प्रसिद्ध ‘ चन्द्रालोक ’ ग्रंथाचा कर्ता जो जयदेव त्याचे ‘ पीयूषवर्ष ’ हे surname होते असे डॉ. दे ह्यांना वाटते.[२] तसेच ‘ पारिजातमंजरी ’ नाटिकेच्या कर्त्याचे-मदनाचे- surname Bāla-sarasvatī of Gauḍa असे होते, असे डॉ. दे म्हणतात.[३] कौतुकरत्नाकर नामक प्रहसनाच्या कर्त्याचे surname ‘ कवि तार्किक ’ होते, असे डॉ. दे ह्यांचे मत आहे.[४] ‘ डॉ. दे ह्यांनी जी सर्व surnames म्हणून म्हटली आहेत, त्या सर्व ‘ पदव्या ’ वाटतात. तथापी, डॉ. दे ह्यांनी मात्र वरील सर्व स्थळी surname शब्दाचाच वापर केला आहे, title शब्दाचा वापर केलेला नाही, ही बाब कटाक्षाने लक्षात ठेवली पाहिजे. आता surname व title ह्या दोन शब्दातील अन्तराकडे डॉ. दे ह्यांनी अजिबात दुर्लक्ष करून title ह्या अर्थाने surname शब्दाचा प्रयोग केला असे गृहीत करणे म्हणजे कल्पनाशक्तीचा अचाट विलास प्रकट करणेच ठरेल ! तेव्हा surname म्हणजे आडनाव किंवा उपनाम हाच अर्थ डॉ. दे ह्यांना अभिप्रेत आहे असे अनुमान करणेच अधिक सरळ व न्याय्य आहे.

(४) व्यासदास हे क्षेमेन्द्राचे तथाकथित उपनाम डॉ. दे ह्यांनी कल्पिलेले नसावे, व्यासदास हे क्षेमेन्द्राचे आडनाव होय असे मानण्यास त्यांना क्षेमेन्द्राच्या ग्रंथांमध्ये कोठेतरी काहीतरी आधार अवश्य मिळाला असला पाहिजे. किमान ‘ व्यासदास ’ शब्दाचे उल्लेख त्यांना निश्चितपणे आढळून आले असले पाहिजेत.[५] तसे ते कोठे, कोणत्या संदर्भात व किती आढळतात ते प्रथमतः लक्षात घेऊ–

(क) “ **श्रीव्यासदासः** क्षेमेन्द्रः कुरुते सरसां स्तुतिम् ॥ १३ ॥ ”[६]

(ख) “ समासमिदं भारतमञ्जरीस्थं व्यासाष्टकस्तोत्रं **कवेर्व्यासदासापरनाम्नः** प्रकाशेन्द्रसूनोः क्षेमेन्द्रस्य ॥ ”[७]

(ग) “ तस्यात्मनः सर्वमनीषिशिष्यः **श्रीव्यासदासापरपुण्यनामा** ॥ ”[८]

( घ ) वरील ख व ग ह्या अवतरणात ज्याप्रमाणे ‘अपरनामा’ शब्दाचा उल्लेख आलेला आहे त्याप्रमाणेच

१. Dr S. K. De– History of Sanskrit Poetics, Vol. I, Calcutta, 1960, p. 91.

२. Dr. S. N. Dasgupta and Dr. S. K. De– A History of Sanskrit Literature, Classical Period, Vol. I, Calcutta, second edition 1962, p, 462.

३, Ibid, p. 472.

४. Ibid p. 499.

५. उपर्युद्धृत अवतरण क्रमांक ३ मध्ये त्यांनी तसे स्पष्टपणे म्हटलेच आहे.

६. क्षेमेन्द्रलघुकाव्यसंग्रहः, हैदराबाद, प्रथम संस्करण १९६१, पृ. ६.

७. तत्रैव पृ. ८

८. तत्रैव पृ. ६२







अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उल्लेख क्षेमेन्द्रलघुकाव्यसंग्रहः , हैदराबाद, प्रथम संस्करण, १९६१ ह्या ग्रंथाच्या पृष्ठांक ९३, १०९ व ११६ ह्यांवरही आला आहे. ह्याखेरीज, भारतमंजरी, काव्यमाला ६४, मुंबई, १८९८ ह्या ग्रंथाच्या पृ. ८५१ वरदेखील ' अपरनाम्नः ' असा निर्देश आहे.

( ङ ) " इति श्रीप्रकाशेन्द्रात्मजव्यासदासापराख्य श्रीक्षेमेन्द्रकृता औचित्यविचारचर्चासमाप्ता ॥ ' [१]

( च ) वरील अवतरणातील ' अपराख्य ' ह्या निर्देशाप्रमाणे निर्देश पुढील ठिकाणीही आढळून येतो–

क्षेमेन्द्रलघुकाव्यसंग्रहः, हैदराबाद, प्रथम संस्करण, १९६१, पृष्ठांक ६६, ७०, ७४, ७७, ८४, १४४, १५३, १६४, १७९, १८७, १९२, १९७, २०६, २१५, २२८, २३६, २४३, २४७, २५१, २५४, २५७, २६०, २६७, २७१, २७५, २७९, २८३, २८७, २९०, २९४, २९७, ३०६, ३२१, ३३५, ३४६, ३५५, ३६६, ३७१, ३८५, ३९४, ३९८, ४०३, ४१५, ४१६, ४१९ व ४२१.

( छ ) 'श्रद्धा श्रीव्यासदासेन समासेन सतां मता ॥'[२]

( ज ) ' इति श्रीव्यासरूपक्षेमेन्द्रविरचितायां महाभारतमंजर्या सभापर्व द्वितीयम् [३] ॥ '

' व्यासदास'–विषयक वरील सर्व निर्देशांचे पृथक्करण केले असता त्यांची पुढील चार वर्गात विभागणी करता येते :–

( १ ) व्यासदास,
( २ ) व्यासदास हे ' अपरनाम, '
( ३ ) व्यासदास ही ' अपराख्या, '
व (४) ' व्यासरूप ' क्षेमेन्द्र.

येथवर केलेल्या विवेचनावरून व उद्धृत केलेल्या अवतरणांवरून पुढील मुद्दे स्पष्ट होतात–

(अ) क्षेमेन्द्राने स्वतःच ' व्यासदास ' शब्दाचा उल्लेख अनेकवार अवश्य केला आहे. त्याच्या आधारानेच डॉ. दे व डॉ. कृष्णम्माचारियर ह्यांनी ' व्यासदास हे क्षेमेन्द्राचे आडनाव होय ' ही आपली भूमिका मांडली असावी.

( आ ) क्षेमेन्द्राने स्वतः व्यासदास हे आपले 'अपरनाम' अथवा 'अपराख्या' असल्याचे अनेकवार निःसंदिग्धपणे म्हटले आहे.

(इ) क्षेमेन्द्राने स्वतः व्यासदास हे आपले आडनाव किंवा उपनाम असल्याचे कोठेही एकवारदेखील म्हटलेले नाही.

(ई) क्षेमेन्द्राने स्वतः व्यासांशी स्वतःची एकरूपता स्पष्ट शब्दात जाहीर केली आहे.

(उ) वरील सर्व उल्लेखांमध्ये व्यासदास ह्या शब्दाचा निर्देश प्रथम झाला असून त्यानंतर क्षेमेन्द्र शब्दाचा निर्देश झाला आहे.

(५) वस्तुतः आतापर्यंतच्या विवेचनावरूनही व्यासदास हे क्षेमेन्द्राचे उपनाम होय ही डॉ. दे –कृष्णम्माचारियर यांची कल्पना निराधार अतएव प्रामादिक असून व्यासदास हे क्षेमेन्द्राचे अपरनाम आहे हे आपोआपच सिद्ध होत आहे. तरीसुद्धा स्वतःच्या भूमिकेच्या समर्थनार्थ अधिकारी विद्वानांची साक्ष काढण्याच्या विद्वन्मान्य प्रथेस अनुसरून, क्षेमेन्द्रसाहित्याचा तसेच समस्त संस्कृत सारस्वताचा अभ्यास करणाऱ्या विद्वानांनी व्यासदास शब्दाचा उल्लेख केला आहे किंवा काय व असल्यास कोणत्या स्वरूपात केला आहे, ते विचारात घेऊ.

(अ) श्री. बील्ने[४] आपल्या चरित्रपर कोशात क्षेमेन्द्राच्या नावाचाही उल्लेख केलेला नाही, तेव्हा व्यासदास पदाचा उल्लेख करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. ( अर्थात् बीलने ज्या काही निवडक कवींचे निर्देश केले आहेत तेही मोठे चिनचूक आहेत असे नव्हे. उदा० बीलने कालिदासाच्या नावावर नलोदय, कुमारसंभव व महानाटक ह्या वाङ्मयकृती, दाखल केल्या आहेत.[५] भर्तृहरीच्या शतकांचा ' century

१. तत्रैव.

२. तत्रैव पृ. १४४.

३. भारतमंजरी, काव्यमाला ६४, मुंबई, १८९८, पृ. १५०.

४, Thomas William Beale– An Oriental Biograppical Dictionary, London, revised and enlarged new edition, 1894.

५. Ibid, p. 206.







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

of sentences ' ह्या शब्दाने उल्लेख केला आहे ![1] आश्चर्य म्हणजे तुलसीदासांचा[2] उल्लेख आहे, पण तुकारामाचा नाही ! भारतीय साहित्याविषयी इंग्रजी-मधून झालेले लेखन ' सावधपणाने' अभ्यासावयाचे ते ह्यासाठीच ! ! )

( आ ) आउफ्रेक्ट[3] क्षेमेन्द्राविषयी म्हणतो– " क्षेमेन्द्र also व्यासदास son of Prakācendra, grandson of Sindhu...... "

[ ह्या साहेबांनी आपल्या कॅटलॉगमध्ये पुढील मजेदार नोंद केलेली आढळते– " केकावली kāvya, by Mayūrapanta. Khn. 40"[4] –मोरोपंतांचे मराठी भाषेत लिहिलेले केकावलि नामक सरस भक्तिकाव्य प्रसिद्धच आहे. ते इतके संस्कृत-प्रचुर आहे की, आउफ्रेक्ट साहेबांना त्याचा अन्तर्भाव आपल्या " An Alphabetical Register of Sanskrit Works and Authors– " ( हे आउफ्रेक्ट साहेबांच्या कॅटलॉगूचे उपशीर्षक आहे ) ह्या सूचीमध्ये निःशंकपणे करावासा वाटला. एकंदरीने संस्कृत भाषेने मराठी भाषेवर कुरघोडी केली म्हणावयाची ! ]

(इ) संस्कृत साहित्य अथवा साहित्यशास्त्र ह्या विषयाच्या व्यासंगी विद्वानांपैकी– म्हणजे डॉ. काणे[5], डॉ. राघवन्,[6] डॉ. सी. कुञ्जन्[7] राजा, डॉ. काइथ्,[8] डॉ. गौरीनाथ शास्त्री,[9] डॉ. रमारंजन मुकर्जी,[10] श्री. हंसराज[11] अग्रवाल–ह्यांपैकी कोणीही व्यासदास हे क्षेमेन्द्राचे आडनाव होय असे म्हटलेले नाही.

( ई ) डॉ. वरदाचारींचा[12] अभिप्राय आहे की, " He had the title Vyāsadāsa, as he received the blessings of the sage Vyāsa. "

( क्षेमेन्द्राला व्यासांचे आशीर्वाद मिळाल्यासंबंधीचा जणू काही पुरावाच आपल्यापाशी आहे अशा थाटाचे डॉ. वरदाचारींचे हे विधान वाचून मोठी मौज वाटते ! )

( उ ) क्षेमेन्द्रलघुकाव्यसंग्रहाचे संपादक श्री. ई. व्ही. व्ही. राघवाचार्य आणि डी. जी. पाध्ये म्हणतात[13] –

---

१. Ibid, p. 107.

२. Ibid, p. 405.

३. Theodor Aufrecht– Catalogus Catalogorum, Part I, Edition of 1962, p. 135,

४. Ibid P. 124.

५. Dr, P. V. Kane–History of Sanskrit Poetics, Delhi, 1961.

६. Dr. V. Raghavan–Some Concepts of the Alankāra Śastra, Madras, 1942.

७. Dr. C. K. Raja–Survey of Sanskrit Literature, Bombay, 1962.

८. Dr. A. B. Keith– A History of Sanskrit Literature. Lodon, reprinted in 1953.

९. Dr. Gaurinath Śastri– A Concise History of Classical Sanskrit Literature, Calcutta, second edition 1960.

१०. Dr. Ramaranjan Mukherji– Literary Criticism in Ancient India, Calcutta, first edition, October. 1966.

११. Hans Raj Aggarwal– A Short History of Sanskrit Literature, Delhi, second edition, 1963.

१२. Dr. V. Varadachari– A History of the Sanskrita Literature, Allahabad, second edition, 1960.

१३. Minor Works of Kṣemendra, Hyderabad, First edition 1961, Introduction p. 3.







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" Kṣemendra was a great admirer of Vyāsa. He summarised the Mahābhārata in his Bhāratamanjari, and acquired the title Vyāsadasa. "

वरील अवतरणांवरून व्यासदास ह्या नावाविषयी खालील तीन मते प्रतीत होतात–

( अ ) व्यासदास हे क्षेमेन्द्राचे अपर नाम.

( आ ) व्यासदास ही क्षेमेन्द्राची पदवी होती.

( इ ) व्यासदास ही पदवी क्षेमेन्द्राने मिळविली होती.

तथापी, वर ज्यांची मते नमूद केली आहेत त्यांपैकी कोणाही विद्वानाने व्यासदास हें क्षेमेन्द्राचे आडनाव होय असे म्हटलेले नाही.

( ६ ) आता येथे असा प्रश्न निर्माण होतो की, क्षेमेन्द्राच्या काळात आडनाव लिहिण्याची प्रथा तरी रूढ होती का ? त्याच्या पूर्वीच्या काळात जे अनेक संस्कृत कवी होऊन गेले किंवा खुद्द त्याच्या काळात जे अनेक कवी काव्यरचना करीत होते त्यांपैकी कोणाचे उपनाम कोठे नमूद आहे का ? तसा काही पुरावा मिळाला तर निदान आडनाव लिहिण्याची प्रथा तत्कालीन कवींमध्ये रूढ होती व व्यासदास हे कदाचित् क्षेमेन्द्राचे आडनाव असावे, असे म्हणता तरी येईल. तथापी आडनाव सोडाच पण खरी नावे तरी किती कवींची आपणाला ठाऊक आहेत, ह्याबद्दलही शंकाच आहे. उदाहरणार्थ, क्षेमेन्द्रपूर्वकाळात जातकमालाकार आर्यशूर, बृहत्कथाकर्ता गुणाढ्य, पंचतंत्राचा कर्ता विष्णुशर्मा, बृहत्कथाश्लोकसंग्रहाचा रचयिता बुधस्वामी इत्यादी कथाकार होऊन गेले. तसेच चाणक्य, दामोदरगुप्त, भर्तृहरी, सुंदरपाण्ड्य, भल्लट इत्यादी नीत्युपदेशात्मक काव्यांचे प्रणेते होऊन गेले. संस्कृत साहित्याच्या इतिहासाला वासवदत्तेचा जन्मदाता सुबंधु, दशकुमाराचा कर्ता दण्डी, कादंबरीचा जनक बाणभट्ट, तिलकमंजरी रचणारा धनपाल व ' मालती ' गुंफणारा हरिचन्द्र हे संस्कृत भाषेतील ' कादंबरी'कारही परिचित आहेत. बाणभट्ट, शंकुक, शिवस्वामी इत्यादी आख्यायिकाकारांचा यथोचित सन्मान तत्कालीन रसिकांनी केला. अश्वघोष, भास, कालिदास, विशाखदत्त, भट्टनारायण, हर्ष, चन्द्रगोमिन्, मुरारी, भवभूती, राजशेखर, इत्यादी नाटककार तर चांगलेच मान्यता पावले होते. पाणिनी, बुद्धघोष, मातृचेट, कालिदास, कुमारदास, भारवी, भट्टी, मेंठ, माघ, भौमक, वाक्पति, रत्नाकर, अभिनन्द, हलायुध इत्यादी यशस्वी महाकवींची नावे रसिकांच्या तोंडी सदैव खेळत होती. कालिदास, घटकर्पर, भर्तृहरी, अमरक, मयूर, मातंगदिवाकर इत्यादी भावकवींची सहृदयांकडून मुक्तकंठाने प्रशंसा होत होती. रत्नाकर, नागराज, आनंदवर्धन, अवतार, वासुदेव इत्यादी चित्रकवींचे स्वागतही रसिकांनी यथोचित पद्धतीने केले होते. अश्वघोष, हर्ष, मयूर, बाण, मानतुंग, चन्द्रक, सामंतभद्र, मूक, लक्ष्मण, शिवदास, सर्वज्ञमित्र, वज्रदत्त, कुलशेखर, पुष्पदंत, शोभन इत्यादींची भक्तिभावपूर्ण स्तोत्रकाव्ये भक्तजनांच्या पठणपाठणात होती. हरिचन्द्र, त्रिविक्रमभट्ट, सोमदेव, सोड्ढल प्रभृती कवी ' चंपू'कार म्हणून रसिकांना चांगले ठाऊक होते. वररुची, ईश्वरदत्त, शूद्रक, श्यामिलक प्रभृतींच्या भाणांचे प्रयोगही प्रेक्षकांच्या पाहण्यात होते. तसेच बोधायन, महेन्द्रविक्रमवर्मन्, इत्यादी उत्तम प्रहसनकार लोकमान्यता पावले होते. परंतु, असे असूनही राजशेखर-भवभूतींसारखे एखाद-दोन तुरळक अपवाद वगळता बाकी बहुसंख्य कवींच्या कुळाची, गणगोताची वा आडनावाची माहिती मुळीसुद्धा उपलब्ध होत नाही. इतकेच नव्हे हरिचन्द्र, मेंठ इत्यादी नावे खरीखुरी व्यक्तिनामे तरी वाटतात, पण कालिदास, दण्डी, बाण इत्यादी नावे प्रतीकात्मक किंवा संकेतविशेषात्मक मानण्याकडेच मनाचा कल होतो.[1] जेथे व्यक्तिनावासंबंधी इतकी अनिश्चितता, तेथे आडनावासंबंधी काय पुसावे ? अर्थात् आडनाव लिहिण्याची प्रथा क्षेमेन्द्रकाळात रूढ नव्हती असेच तर्कशुद्ध अनुमान निघते. आडनाव लिहिण्याची प्रथा बऱ्याच उशीरा म्हणजे सतराव्या शतकात सुरू

१. डॉ. वरदाचारी असेच मानतात, पाहा– Dr. V. Varadachari-A History of The Saṁskṛta Literature, Allahabad, 2 nd edition 1960, p p. 6-7.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

झाली असे डॉ. गोडे[1] यांनी सप्रमाण दाखवून दिले आहे. क्षेमेन्द्र अकराव्या शतकात होऊन गेलेला असल्यामुळे त्याने उपनाव लिहिण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. वरील युक्तिवादावरून हेच निःसंदिग्धपणे सिद्ध होते की, व्यासदास हे, डॉ. दे. व डॉ. कृष्णम्माचारियर ह्यांच्या समजाप्रमाणे, क्षेमेन्द्राचे आडनाव नसून अपरनाम होय.

( ७ ) येथे साहजिकपणेच एक शंका मनात उत्पन्न होते. ती अशी की डॉ. दे व कृष्णम्माचारियर ह्यांच्यासारखे विद्वन्मान्य पंडित व्यासदास ह्या नावाने चकले कसे ? अपरनाम व उपनाम ह्यातील भेद ह्या पंडितांना समजला नाही असे गृहीत करणे धाडसाचे ठरेल. पण मग ही ढोबळ चूक झाली कशी ? ह्या प्रश्नाचे एक संभाव्य उत्तर सुचवून मग प्रस्तुत लेखात उपस्थित केलेल्या प्रश्नाच्या दुसऱ्या बाजूकडे वळू.

व्यक्तीला आपले संपूर्ण नाव संस्कृत भाषेत लिहावयाचे झाल्यास प्रथम आडनाव, मग पितृनाम व मग स्वनाम ह्या क्रमाने ते **सामान्यपणे** लिहावे लागते. सतराव्या–अठराव्या शतकातील ज्या काही संस्कृत कवींनी आपली नावे लेखनिविष्ट केली आहेत. त्यांनी प्रायः हाच क्रम सांभाळला आहे. उदा. शृंगारवापिका नामक नाटिकेतील समाप्तिपर निर्देश पुढीलप्रमाणे आहे– ' इति श्रीचित्तपावनजातीयरानड्योपनामककविविश्वनाथभट्टविरचिता शृंगारवापिका नाम नाटिका काश्यां परिपूर्णा संवत् १७६३ समए अगहन वदि अष्टमी । "[2] तसेच, ' इति नवहस्तरघुनाथभट्टविरचितप्रायश्चित्तप्रकरणं समाप्तम् ॥ '[3] पुनः, ' इति श्रीकविकौस्तुभे महाकाव्यकविकुलावतंसमनोहरोपनामककृष्णपण्डितसूनुश्रीमद्दिकंभट्टसूरिसुतश्रीमद्रघुनाथपण्डितकविकृतौ दूषणकथनं नाम द्वितीयं रत्नम् ॥ '[4] वरील तिन्ही उद्धरणात प्रथम उपनाम व तदनंतर व्यक्तिनाम ह्या क्रमाने नावाचा निर्देश झालेला आढळतो.[5] वर चवथ्या कलमात क्षेमेन्द्र–ग्रंथांतील जी वचने उद्धृत केली आहेत, त्या सर्वांमध्ये व्यासदास ह्या नावाचा उल्लेख सुरुवातीस असून तदनंतर क्षेमेन्द्र नावाचा निर्देश आहे. ह्या प्रकारामुळेच कदाचित् डॉ. देव कृष्णम्माचारियर यांची दिशाभूल झाली असावी.

(८) आतापर्यंतच्या विवेचनावरून व्यासदास हे क्षेमेन्द्राचे उपनाम नाही असे जरी ठामपणे सिद्ध होत असले तरी हा निष्कर्ष अकरणात्मकच (negative) आहे. व्यासदास शब्दाचे सत्स्वरूप काय ह्याचा निश्चितपणे बोध होत नाही. त्यामुळेच मनात अनेक प्रश्न होतात, ते असे–

(अ) व्यासदास ही पदवी क्षेमेन्द्राला कोणी बहाल केली नव्हती ना ?

(ब) तसे नसेल तर ती पदवी काय त्याने स्वतः धारण केली होती ?

(क) तसे असल्यास कारण काय ?

(ड) अशा पदव्यांचा किंवा अपरनावांचा उल्लेख इतर कोणी केला आहे काय ?

(ई) असल्यास त्याने अथवा त्यांनी ती नावे का धारण केली होती ?

---

१. Dr. P. K. Gode–Studies in Indian Literary History, Vol. II, Bombay, 1954, p. 262.

२. Ibid p. 270. वरून उद्धृत.

३. Ibid p. 407 वरून उद्धृत.

४. Dr P. K. Gode–Studies in Indian Literary History, Vol. III Poona, 1956, p. 36.

५. अर्थात् ह्या सर्वसाधारण नियमालाही क्वचित् अपवाद आढळून येतो. उदाहरणार्थ, पुढील अवतरणात व्यक्तिनाम, उपनाम व पितृनाम ह्या क्रमाने नामोल्लेख झाले आहेत–

' प्रणम्य परमात्मानं नीलकण्ठो विचक्षणः ।
थत्थोपनामकः सूरिर्विनायकतनूद्भवः ॥ ' –

Dr. P. K. Gode– Studies in Indian Literary History, Vol. III, Poona, 1956, p, 83 वरून उद्धृत.











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ह्या प्रश्नांचा विचार केल्यावर 'व्यासदास शब्दाचा अर्थ काय ?' ह्या प्रश्नाचे करणात्मक ( positive ) उत्तर मिळू शकेल, म्हणून वरीलपैकी एकेक प्रश्नच आता क्रमशः विचारात घेऊ.

( ९ ) व्यासदास ही क्षेमेन्द्राची पदवी होती असे डॉ. वरदाचारींचे मत असल्याचे वर पाचव्या कलमात दाखवून दिलेच आहे. क्षेमेन्द्रलघुकाव्यसंग्रहाच्या संपादकांच्या मती क्षेमेन्द्राने ही पदवी प्राप्त करून घेतली होती, हेही वर त्याच कलमात स्पष्ट केले आहे. ह्या दोघांही विद्वानांची ही मते तपासून पाहावयास हवीत.

एखाद्या कवित्वाचा किंवा पंडिताच्या पांडित्याचा गौरव करण्यासाठी त्याला एखादी बहुमानसूचक पदवी देण्याची प्रथा प्राचीन काळात रूढ होती. अशा पदव्यांचे निर्देश त्या त्या ग्रंथकारांच्या शिष्यांच्या वा अनुयायांच्या ग्रंथांमध्ये आढळून येतात. उदाहरणार्थ, प्रसन्नराघव ह्या नाटकाचा कर्ता जो जयदेवकवी त्यास त्याच्या सुंदर पद्यरचनेमुळे 'पीयूषवर्ष' असे म्हणत असत.[१] धूर्तसमागम नामक प्रहसनाच्या कर्त्याची ज्योतिरीश्वराची–कविशेखर ही पदवी होती.[२] ध्वनिकारांना 'सहृदय' म्हणून संबोधीत असत.[३] किरणावली, तात्पर्यपरिशुद्धी इत्यादी प्रसिद्ध ग्रंथांचा कर्ता जो उदयनाचार्य त्यास न्यायवैशेषिक दर्शनातील प्रावीण्याबद्दल- 'न्यायाचार्य' म्हणत असत, तर गंगेशांच्या तत्त्वचिंतामणि नामक ग्रंथावर तत्त्वचिंतामण्यालोक लिहिणाऱ्या जयदेवाला 'पक्षधरमिश्र' म्हणून संबोधीत असत. राजशेखर स्वतःला कविराज म्हणवून घेत असे हे प्रसिद्धच आहे. ( राजशेखराच्या मती 'कविराज' शब्दाचे लक्षण असे आहे- 'यस्तु तत्र तत्र भाषाविशेषे तेषु तेषु प्रबन्धेषु तस्मिंस्तस्मिंश्च रसे स्वतन्त्रः स कविराजः '[४]) एकंदरीने अनेक प्राचीन कवींच्या स्वगृहीत किंवा इतरदत्त पदव्यांचा उल्लेख आढळून येतो. क्षेमेन्द्राला व्यासदास ही पदवी जर कोणी दिलेली असती तर त्याने स्वतःच तिचा तसा उल्लेख अवश्य केला असता. कारण त्याने स्वतः आपल्या इतर काही विशेषणांचा उल्लेख केलेला आहे. उदाहरणार्थ, तो स्वतःला 'सर्वमनीषिशिष्य'[५] म्हणवून घेतो. बृहत्कथामंजरीच्या[६] उपसंहार–श्लोक–क्रमांक ३८ मध्ये त्याने आपल्या 'नारायणपरायण' ह्या विशेषणाचा उल्लेख केला आहे. भरतमंजरीच्या रचनेमुळे आपल्याला कवीन्द्रता लाभल्याचे त्याने स्वतःच म्हटले आहे. ('एष विष्णुकथातीर्थपुण्यवत्सलिलोक्षितः । प्राप्तः सामान्यजल्पोऽपि क्षेमेन्द्रोऽद्य कवीन्द्रताम् ॥ ')[७] तसेच त्या काव्यामुळे कविमंडळात आपल्या नावाचा उच्चार होऊ लागला असेही त्याने म्हटले आहे.[८] तेव्हा, आपल्या कर्तृत्वाचा इतक्या साक्षेपाने पण विनम्रतेने निर्देश करणारा क्षेमेन्द्र, त्यास व्यासदास ही पदवी कोणी बहाल केलेली असती, तर तिचा तसा निर्देश करावयास विसरला नसता. ज्याअर्थी तसा उल्लेख आढळत नाही त्याअर्थी व्यासदास ही पदवी क्षेमेन्द्राला कोणी दिली होती असे न मानता ते विशेषण त्याने स्वतःच धारण केले होते मानणेच अधिक युक्तिसंगत आहे.

(१०) क्षेमेन्द्राने व्यासदास हे विशेषण स्वतःच धारण केले होते असे जरी घटकाभर मानिले तरी त्यास

---

१. Dr. V. Varadachari– A History of the Saṁskṛta Literature, Allahabad, second edition, 1960, p. 160.

२. Ibid.

३. Ibid p. 177.

४. कविराज राजशेखर–विरचिता काव्यमीमांसा, हरिदास–संस्कृत–ग्रन्थमाला १४, बनारस, १९३४, पृ. ९२.

५. वा. के. लेले– संपादित क्षेमेन्द्रप्रणीत औचित्यसिद्धान्त आणि औचित्यविचारचर्चा, वाराणसी, प्रथमावृत्ती १९६६, पृ. १५७, श्लोक २.

६. बृहत्कथामंजरी, काव्यमाला ६९, मुंबई, १९०१.

७. भारतमंजरी, काव्यमाला ६४ मुंबई १८९८ पृ. ८५१ श्लोकांक ५.

८. तत्रैव, श्लोकांक ७.



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असे करण्याचे कारण काय असा प्रश्न येथे साहजिक-पणेच निर्माण होतो. त्याचेच उत्तर शोधून काढण्याचा प्रयत्न करू. क्षेमेन्द्राने व्यासरचित महाभारताचा संक्षेप आपल्या भारतमंजरीत[1] केलेला असल्याचे प्रसिद्धच आहे. महर्षी व्यासांविषयी क्षेमेन्द्राच्या मनात पूज्यबुद्धी व उत्कट कोटीची आदरभावना वसत होती. क्षेमेन्द्राला महर्षी व्यास हे ' भुवनोपजीव्य ' कवी वाटत असत (' भुवनोपजीव्यः यथा भगवान् व्यासः । '[2] ) त्याने व्यासांना ' ज्ञाननिधि ' हे विशेषण लावले आहे. तसेच त्याने आपल्या सुवृत्त-तिलकामध्ये[3] महर्षी व्यासांचा ' नमश्छन्दोनिधानाय सुवृत्ताचारवेधसे । तपःसत्यनिवासाय व्यासायामित-तेजसे ।। ' ह्या शब्दात गौरव केला आहे. व्यासरचित महाभारत म्हणजे इतर कवींच्या उपजीविकेचे उत्कृष्ट साधन होय[4] अशी क्षेमेन्द्राची महाभारताविषयीची कल्पना आहे. व्यासांविषयी क्षेमेन्द्राला वाटणाऱ्या ह्या पूज्यभावनेतूनच पुढील व्यासाष्टकस्तोत्र आविर्भूत झाले आहे–

' नमो ज्ञानानलशिखापुञ्जपिञ्जजटाभृते ।
कृष्णायाकृष्णमहसे कृष्णद्वैपायनाय ते ।। १ ।।
नमस्तेजोमयश्मश्रुप्रभाशबलितत्विषे ।
वक्त्रवागीश्वरपद्मरजसेवोदिताश्रिये ।। २ ।।
नमः सन्ध्यासमाधाननिष्पीतरवितेजसे ।
त्रैलोक्यतिमिरोच्छेददीपप्रतिमचक्षुषे ।। ३ ।।
नमः सहस्रशाखाय धर्मोपवनशाखिने ।
सत्त्वप्रतिष्ठापुष्पाय निर्वाणफलशालिने ।। ४ ।।
नमः कृष्णाजिनजुषे बोधनन्दनवासिने ।
व्यासायेवालिजालेन पुण्यसौरभलिप्सया ।। ५ ।।
नमः शशिकलाकारब्रह्मसूत्रांशुशोभिने ।
श्रिताय हंसकान्त्येव संपर्कार्कमलौकसः ।। ६ ।।
नमोविद्यानदीपूर्णशास्त्राब्धिसकलेन्दवे ।
पीयूषरससाराय कविव्यापारवेधसे ।। ७ ।।
नमः सत्यनिवासाय स्वविकाशविलासिने ।
व्यासाय धाम्ने तपसां संसारायासहारिणे ।। ८ ।।'[5]

क्षेमेन्द्राने स्वतःला एके ठिकाणी ' व्यासरूप ' म्हण-वून घेतले असल्याचे वर चवथ्या कलमात नमूद केले आहेच. वरील सर्व तपशीलाचा विचार करता असेच म्हणावेसे वाटते की, क्षेमेन्द्राने स्वतःच्या अंतःकरणात उचंबळणारी व्यासविषयक आदरभावना जाहीररीत्या प्रकट करण्यासाठी स्वतःच व्यासदास हे विशेषण धारण केले असून त्याचाच अनेक स्थळी प्रयोग केला आहे.

( १० ) आता प्रश्न असा उपस्थित होतो की, क्षेमेन्द्राच्या ह्या कृत्यास परंपरेचा पाठिंबा आहे काय ? असे इतर कोणी कवी क्षेमेन्द्रकाळात तसेच तत्पूर्वकाळात होऊन गेले का की ज्यांनी अशी अपरनामे धारण करून ती आपल्या काव्यादिकास नमूद करून ठेवली होती ? ह्या प्रश्नाचे उत्तर होकारार्थीच आहे. पूर्णदास, देवदास, अनन्तदास, कालिदास, कृष्णदास, धर्मदास, हरिदास, विष्णुदास, दामोदरदास, सूर्यदास अशी ' दासान्त ' नावे धारण करणारे अनेक कवी होऊन गेले. ह्यापैकी काहींची नावे त्यांना त्यांच्या मातापित्यांनी ठेवलेली असली तरी कालिदास, सूर्यदास ह्यांसारखी नावे त्या त्या कवींनी स्वतःला एखाद्या विशिष्ट देवतेविषयी, तत्त्वाविषयी वा गुरूविषयी वाटणारी आदरभावना प्रकट करण्यासाठीच धारण केलेली दिसतात. पुनः, मातापित्यांनी ठेविलेली किंवा स्वतः धारण केलेली अशी अपरनामे ते ते संस्कृत कवी आपापल्या ग्रंथांमधून अभिमानपुरस्सर उल्लेखितांनाही आढळतात. उदाहरणार्थ, वासुदेवकृत ' युधिष्ठिरविजय ' नामक यमककाव्यावर पदार्थचिंतन नावाची टीका लिहिणारा विद्वान राघव हा श्रीकण्ठाचा शिष्य असल्यामुळे

---

१. भारतमंजरी, काव्यमाला ६४, मुंबई १८९८.

२. वा. के. लेले संपादित क्षेमेन्द्रकृत कविकण्ठाभरण, वाराणसी, प्रथमावृत्ती १९६६, पृ. ३७.

३. क्षेमेन्द्रलघुकाव्यसंग्रहः, हैदराबाद, प्रथम संस्करण, १९६१, सुवृत्ततिलकम् ३।३.

४. ' इदं कविवरैः सर्वैः आख्यानं उपजीव्यते ।
उदयं प्रेप्सुभिर्भृत्यैः अभिजात इवेश्वरः ।। ' –

वा. के. लेले– संपादित क्षेमेन्द्रकृत कविकण्ठाभरण, वाराणसी, प्रथमावृत्ती १९६६, पृ. ३७.

५. भारतमंजरी, काव्यमाला ६४, मुंबई, १८९८, पृ. ८५० श्लोक १३–२०.



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'श्रीकण्ठदास' ह्या नावाने ओळखला जातो अशी माहिती डॉ. के. के. राजा[1] पुरवितात. 'विद्धशालभंजिका' ह्या नाटकावर मार्गदर्शिनी नामक टीका लिहिणारा वासुदेव टीकेच्या शेवटी पुढील उल्लेख करतो– 'इति श्रीमत्करुणाकरशिष्येण साहित्यमल्लापराख्येन विरचितायां विद्धसालभञ्जिकामार्गदर्शिन्यां पञ्चमोऽङ्कः समाप्तः ॥[2] (येथे ग्रंथकाराने आपल्या गुरूचे नाव तसेच आपले स्वतःचे अपरनाम ह्या दोहोंचा उल्लेख केला आहे.) केरळीय विद्वान कवी 'महर्षि' हा त्रैविद्येश ह्या अपरनावाने ओळखला जात असे, असे त्याच्या स्वतःच्या पुढील उक्तीवरून म्हणता येते– 'इति त्रैविद्येशापरनामधेयश्रीमहर्षिपुत्रपरमेश्वरविरचिते सूत्रार्थसङ्ग्रहे तृतीयाध्यायस्य तृतीयः पादः ॥'[3] तात्पर्य, आपल्या अपरनामाचा उल्लेख करण्याची प्रथा प्राचीन ग्रंथकारामध्ये प्रचलित होती आणि क्षेमेन्द्राने तिचेच अनुसरण केले.

प्रस्तुत लेखातील समस्त विवेचनामधून निघणारे ठळक निष्कर्ष वाचकांच्या सोयीसाठी संकलित रूपामध्ये मांडतो–

(१) क्षेमेन्द्राने व्यासदास शब्दाचा उल्लेख आपल्या साहित्यकृतीत स्वतःच अनेक वेळा केला आहे.

(२) व्यासदास हे क्षेमेन्द्राचे अपरनाम होय.

(३) व्यासदास हे क्षेमेन्द्राचे आडनाव surname नव्हे.

(४) व्यासदास ही पदवी क्षेमेन्द्राला कोणी बहाल केलेली नव्हती.

(५) क्षेमेन्द्राने स्वतःला व्यासदास हे विशेषण लावून घेतले होते.

(६) व्यासदास हे विशेषण म्हणजे क्षेमेन्द्राला व्यासांविषयी वाटणाऱ्या निस्सीम आदराचे प्रतीक किंवा चिरस्थायी स्मारक होय.

(७) अशी अपरनामे किंवा स्वगृहीत विशेषणे लिहिण्याची प्रथा प्राचीन कवींमध्ये प्रचलित होती.

(८) आडनावे लिहिण्याचा प्रघात खूप उशीरा म्हणजे इसवी सनाच्या सतराव्या शतकात रूढ झाला.

---

१. Dr. K. Kunjunni Raja – The Contribution of Kerala to Sanskrit Literature, Madras, 1958, P. 25 / footnote 132

२. Ibid, page 73 / footnote 40 वरून उद्धृत.

३. Ibid p. 97 / footnote 114 वरून उद्धृत.

महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना
लेखक–चा. अ. दाभोलकर
किं. २ रुपये
प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई (सातारा)



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. भा. पं. बहिरट

# फ्रेड्रिक विल्हेम शेलिंग

कँटच्या परीक्षणात्मक तत्त्वज्ञानातील अज्ञेय वस्तूच्या कल्पनेस दूर सारून त्यांतील विधायक बाजूचा विकास करणेचा प्रयत्न फिख्टने केला. फिख्टच्या विचारसरणीचा अभ्यास करून स्वतःच्या मते अधिक निर्दोष प्रणाली मांडण्याचा प्रयत्न जर्मन तत्वज्ञ शेलिंगने केला. शेलिंगच्या काळामध्ये गटे श्लेगेल इत्यादी प्रमुख साहित्यिकांनी सौंदर्यवादाचे वातावरण निर्मिले होते. त्या वातावरणाचा परिणाम शेलिंगवर होणे साहजिक होते. त्यामुळे त्याच्या तात्त्विक विचारावर सौंदर्यवादाची घनदाट छाया उमटली व जर्मनीतील तत्कालीन सौंदर्यवादाचा तात्त्विक पुरस्कर्ता म्हणून त्याची प्रसिद्धी झाली.

शेलिंगचा जन्म इ. स. १७७५ तील जानेवारीच्या २७ तारखेस लिओनवर्ग येथे झाला. त्याचा बाप टुबिंजेनजवळच्या गावी शिक्षक व धर्मोपदेशक होता. वयाच्या १५ व्या वर्षी शेलिंगने टुबिंजेनच्या विद्यापीठात प्रवेश केला. पुढील पाच वर्षांत तो हेगेलचा व जर्मनीतील सौंदर्यवादी कवि होल्डर लिनचा सहाध्यायी होता. हेगेल हा शेलिंगहून पाच वर्षांनी वडील होता. वयाच्या मानाने खूप चलाख व परिपक्व बुद्धीचा विद्यार्थी म्हणून त्याची प्रसिद्धी होती. त्याच्या आवडीचे विषय इतिहास व तत्त्वज्ञान होते. त्याने कँट व फिख्ट यांच्या ग्रंथांचा चांगला अभ्यास केला. विसाव्या वयातच त्याचा ( Vom Ich ); ( मी विषयक ) प्रबंध प्रसिद्ध झाला. या प्रबंधामुळेच जेना येथील विद्यापीठातून फिख्टने सोडलेली तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकाची जागा त्यास मिळाली. १७९८ ते १८०३ मध्ये तो या जागेवर होता. या पाच वर्षांत त्याने यशस्वी रीतीने व्याख्याने दिली, महत्त्वाचे ग्रंथ लिहिले व वैयक्तिक जिव्हाळ्याचे संबंध संपादिले. जेना शहर हे सभोवार टेकड्यांनी वेष्टिलेल्या दरीत वसलेले निसर्गरमणीय शहर होते. जेनाचे विद्यापीठ प्रॉटेस्टंट पंथीयांनी स्थापीले होते व मार्टिन लूथरच्या स्मृति तेथे वावरत होत्या. जेना- मध्येच शेलिंगचा प्रसिद्ध जर्मन कवी गटे, त्याचप्रमाणे टीक, नोव्हालिस, श्लेगेलबंधु या सौंदर्यवादी साहित्यिकांशी स्नेह जमला. श्लेगेलने शेक्सिपअरचे जर्मन भाषेत उत्कृष्ट रूपांतर केले होते. त्याची पत्नी कॅरोलिन ही या कविमंडळाच्या केन्द्रस्थानी होती. ती अत्यंत बुद्धिमान्, रसिक व सुंदर होती. तिच्याशी शेलिंगचा दाट परिचय झाला. तिच्या मुलीशी शेलिंगचा विवाह होण्याचे ठरले. परंतु ती अचानक मृत्यू पावली. पुढे श्लेगेल व कॅरोलिन यांच्यात घटस्फोट होऊन कॅरोलिन शेलिंगशी विवाहबद्ध झाली. या घटनेनंतरही तिघात स्नेह होता. श्लेगेलने पुढे दुसरा विवाह केला. त्याने प्राच्य वाङ्मयाचा अभ्यास करून भगवद्गीतेच्या लॅटिन भाषांतराचे व रामायणाचे संपादन केले. त्याच्या पासूनच जर्मनीतील संस्कृत पांडित्याची सुरवात झाली. जेनामधील सौंदर्यवादी विचारसरणीच्या वातावरणात शेलिंगच्या तत्त्वचिंतनाचा विकास झाला व तो सौंदर्यवादाचा तात्त्विक पुरस्कर्ता म्हणून ओळखला जाऊ लागला. १८०३ मध्ये शेलिंगने जेना सोडले.

१८०३ ते १८०६ पर्यंत शेलिंगने वुर्झबर्गच्या विद्यापीठात प्राध्यापकाचे काम केले. या काळात त्याचा कल गूढवादाकडे झुकू लागून फिख्ट व हेगेल यांच्या विचारसरणीशी त्याची ताटातूट झाली. हेगेलने टीका करून त्याच्यावर भावनावशतेचा आरोप केला. त्यात तथ्यांश असलेमुळे त्या टीकेचा त्यास धक्का बसला. १८०६ त कॅरोलिन वारली. तिच्या तरुण मैत्रिणीशी शेलिंगने विवाह केला. यानंतर त्याचे जीवन सुखी कुटुंबवत्सलाचे होते. म्युनिचमधल्या विज्ञानाच्या परिषदेत त्यास सन्मानाची जागाही मिळाली. मध्यंतरी काही वर्षे अर्लजेनमध्ये प्राध्यापक म्हणून काम केल्यावर १८२७-४१





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पर्यंत म्युनिचमध्ये नवीन स्थापन झालेल्या विद्यापीठात तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकाच्या जागेवर तो राहिला. यावेळी हेगेलच्या विचारसरणीविरुद्ध प्रतिक्रिया सुरू होती. शेलिंगला हेगेलच्या मताच्या खंडनार्थ बर्लिन विद्यापीठाने व्याख्याने देण्यास बोलाविले. व्याख्यानाचा विषय 'इतिहासाचे तत्त्वज्ञान' असून व्याख्यान ऐकण्यासाठी युरोपमधल्या सर्व निरनिराळ्या थरातील श्रोत्यांनी दिवाणखाना भरून गेला होता. हेगेलच्या विचारसरणीचे निराकरण करणारे काही नवीन तत्त्वज्ञान ऐकावयास मिळेल या उत्सुकतेने समाज भरगच्च जमला होता. त्यात एंजल्स, कीर्केगार्ड, बकुनिन व तरुण पिढीचे इतर अनेक प्रतिनिधी उपस्थित होते. परंतु शेलिंगची व्याख्याने ऐकून त्यांची फार निराशाच झाली. ही निराशा त्याना अध्यात्मवादाकडून मूलगामी वास्तववादाकडे वळण्यास कारणीभूत झाली. कीर्केगार्डचे मनात अस्तित्ववादी तत्त्वज्ञानाची कल्पना उद्भवली. बकुनिन हा रशियातील अराजकतावादाचा संस्थापक बनला. एंजल्स हा ईश्वर उपासनेकडून मानवी समाजाच्या उपासनेकडे वळला. सारांश, शेलिंगच्या व्याख्यानगृहातून ज्या तात्त्विक कल्पना बाहेर पडल्या त्यांनी पुढे मानवाच्या इतिहासावर प्रचंड परिणाम घडवून आणला. शेलिंगने आपले उर्वरित आयुष्य आपल्या विचाराचा विकास करण्यात व हेगेलवर टीका करण्यात घालविले व इ. स. १८५४ मध्ये त्याने जीवितयात्रा संपविली.

कँटच्या विचारसरणीतील फिख्टच्या विचारावर परिणाम करणारा ग्रंथ त्याची "नैतिक बुद्धीची मीमांसा" हा होता तर शेलिंगच्या विचारावर कँटच्या "सौंदर्यबुद्धीची मीमांसा" या ग्रंथाचा परिणाम झाला. फिख्टने नैतिक अनुभूति प्रमाण मानून अंतिम तत्त्व हे नैतिक चित्तत्वरूपी असून त्याने नैतिक आविष्कारासाठी विश्व निर्माण केले. नैतिक विकास हा विरोधी शक्तीच्या संघर्षातून होतो. निसर्ग म्हणजे चैतन्याचीच निर्मिती स्वतःच्या विरोधी संघर्षास्तव झाली. तेव्हा ती नैतिक विकासास साधनभूत अशी दुय्यम गोष्ट होय. या तऱ्हेची निर्मिति 'अहं' तून 'इदं'ची अगर आत्म्यातून अनात्म्याची झाली. शेलिंगचा दृष्टिकोन याहून भिन्न होता. निसर्गास नैसर्गिक प्रगतीचा अडथळा व त्याच स्वरूपात त्याची केवळ गौण अशी साधनरूपता त्यास पटली नाही. तो सौंदर्यवादी होता. निसर्गाकडे नैतिक दृष्टया न पहाता त्याने रसिक दृष्टीने त्याच्या अंतरंगाचा ठाव घेण्याचा प्रयत्न केला. निसर्गाकडे आकर्षिले जाण्यास तत्कालीन वातावरणही कारणीभूत झाले. युरोपमधील १८ व्या शतकाच्या उत्तरार्धातील काल हा निसर्गाविषयीच्या नवीन आकर्षणाने भारलेला होता. तत्कालीन कवीवर स्पिनोझाच्या लिखाणाचा परिणाम होऊन निसर्गात ईश्वर भरलेला आहे या दृष्टीतून ते काव्यनिर्मिती करीत होते. शास्त्रज्ञ हे नवीन नवीन शोध लावून नवीन आकर्षक सिद्धांत विवरण करीत होत. लॅव्होइसीअरने प्राणवायूचा शोध लावला. गॅलव्हनी या इटालिअन संशोधकाने प्राण्यांतील विद्युतचे संशोधन केले. इरासमस डार्विन या चार्लस डार्विनच्या आजोबाने लामार्कच्या विकासवादाच्या सिद्धांताचा सूचक असा ग्रंथ प्रसिद्ध केला. साहित्यसमीक्षक, तत्वज्ञ व कवी यांचा सुद्धा विज्ञानविषयक सिद्धांत बांधण्यात व संशोधन करण्यात वाटा होता. विंकेल्मन, हर्डर व लेसिंग यांनी विकासवादाचा सिद्धांत कला, इतिहास व वाङ्मय यांच्या प्रांतात लावून दाखविला. कँटने लाप्लेसच्या तेजोविषयक सिद्धांताची पूर्व सूचना केली तर गटेसारख्या प्रतिभावान साहित्यिकाने पुष्पांचा काही भाग म्हणजे पानांचेच परिणत रूप होय असा सिद्धांत सुचविला. त्याकालातील या सर्व गोष्टींचा परिणाम शेलिंगच्या तात्त्विक विचारसरणीवर झाला यात नवल नाही.

शेलिंगच्या मते निसर्गाकडे केवळ विरोधी शक्ति या दृष्टीने न पहाता अधिक विधायक दृष्टीने पाहिले पाहिजे. याप्रमाणे त्याचे खरे स्वरूप समजून घेतल्यावरच आपणास चिन्मय विश्वाचे रहस्य समजेल. फिक्टला निसर्ग हा नुसता ज्ञानाचा विषय आहे. पण विषय होणारा पदार्थ हा विषयीच्या व विषयाच्या मूलतत्वाचे ऐक्य असेल तरच आकलन होऊ शकेल. निसर्गावर जर त्याला जाणणाऱ्या चैतन्याची खूण असेल तरच तो ज्ञात होऊ शकेल. निसर्गास जाणणाऱ्या चैतन्यात कार्य करणाऱ्या शक्ति निसर्गात











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अगोदरच वसत आहेत असे आपणास आढळले. तरच निसर्गातून चैतन्य कसे विकसित होते हे समजेल. निसर्ग म्हणजे चैतन्याच्या पुनरागमनाचे महाकाव्यच होय. शेलिंगने या पुनरागमनास होमरच्या ओडेसी या प्रसिद्ध महाकाव्याची उपमा दिली आहे. ओडीसस हा ग्रीक देशातील इथिकाचा राजा चाणाक्ष व हुषार असतो. ट्रोजन युद्धानंतर तो भ्रमंती करतो व अनेक साहसी व कठीण प्रसंगातून आपल्या राजधानीस परत येतो असे होमरने वर्णिले आहे. निसर्गाची राहणी व गति याच तऱ्हेची आहे. वरवर जड दिसणाऱ्या निसर्गाचा उगम केवल चैतन्यच असून ते जडस्वरूप धारण करून पुन्हा आपल्या चैतन्य स्वरूपाकडे जात असते. ते स्वतःच्याच बाह्य स्वरूपाकडून अंतःस्वरूपाकडे जाते. निसर्गाची गतिमानता ही नुसती गति नसून सहेतुक वाटचाल असते.

आधुनिक विज्ञान हे निसर्गातील प्रत्येक गोष्टीचे मूलतत्त्व फक्त गति हेच मानून जड परमाणूंच्या परस्पर क्रियेने प्रत्येक गोष्टीचा उलगडा करण्याचा प्रयत्न करते. हे स्पष्टीकरण म्हणजेच जर निसर्गातील सारभूत गोष्ट असेल तर चैतन्याची कल्पनाच अजिबात सोडून दिली पाहिजे. किंवा ते कोठून तरी बाहेरून निसर्गात शिरले असावे असे म्हटले पाहिजे. परंतु शेलिंगच्या मते निसर्गातील सहेतुकता बाहेरील ईश्वरी बुद्धीचा परिणाम आहे असे मानणे म्हणजे तात्त्विक विचार करणेचे सोडून श्रद्धाळू चिंतनात रमणे होय. शिवाय त्यामुळे मुख्य जो तात्विक प्रश्न त्याला स्पर्शच केला जात नाही. कार्यकारणभावाची व्यवस्था हे ज्याचे रूप आहे ते विश्व आपण कसे पाहू शकतो? अशा तऱ्हेची रचना आपणासाठी कशी उदय पावते ? विज्ञानाचा शोधक हा आपणास प्रत्यक्ष प्राप्त असलेल्या निसर्गात वावरतो तर निसर्गाचा तत्त्वज्ञ हा निसर्गच आपणास कसा मिळतो असा प्रश्न विचारतो. हा प्रश्न निरर्थक नसून खरोखरी महत्वाचा प्रश्न आहे हे नाकारता येणार नाही. तो प्रश्न अध्यात्मवादी तत्वविचाराचे दृष्टीने असो वा विज्ञानाचे दृष्टीने असो तो शेलिंगने स्पष्टपणे मांडला आहे. विद्यमान विश्वाची चैतन्यात्मक बाजू समजून घेणे असेल तर विज्ञानास माहीत असलेल्या निसर्गाच्या यांत्रिक बाजू खेरीज व नैसर्गिक नियम म्हणून मानलेल्या गोष्टीखेरीज निसर्गामधील अन्य गुणधर्म व शक्ती यांचा आपणास शोध घेता आलाच पाहिजे.

हा प्रश्न सोडविण्याचा शेलिंगने प्रयत्न केला. फिख्टने जाणीवेत दाखविलेले अनंत शक्ती व मर्यादित शक्तीचे द्वंद्व हे सर्व निसर्गातही व्यापून असले पाहिजे. सचेतन जीवन हे विरोधावर-द्वैतावर-आधारलेले आहे म्हणून ज्यातून सचेतन जीवन व्यक्त होते त्या संपूर्ण विरोधी शक्ती कनिष्ठ प्रकाराने का होईना पण व्यक्त झाल्या पाहिजेत. किंवा लायबिनिझ म्हणतो त्याप्रमाणे निसर्गातील सर्व शक्ती कमी अधिक प्रमाणात व्यक्त होणाऱ्या चेतन शक्तीच होत. जड पदार्थ म्हणजे सुप्त चैतन्य म्हणजे गतिमानतेच्या मार्गावरील विशिष्ट अवस्थेतील जड पदार्थच होय. परंतु शेलिंगला या तऱ्हेच्या सर्व सामान्य तत्त्वाच्या अगर गृहीतकृत्याच्या पुढे जातो. ज्या अवस्थातून निसर्ग चैतन्यापर्यंत पोहोचतो त्या निरनिराळ्या अवस्थांची तपशीलवार माहिती सुद्धा आपणास शोधता येईल असा त्यास विश्वास आहे. तो चैतन्यशक्तीपासून सुरवात करतो आणि त्या शक्ती निसर्गाच्या अगदी खालच्या तळापासून कार्य करतात अशी कल्पना करतो. निसर्गातील शक्ती व स्वरूपे यांची सचेतन जीवापर्यंत उत्तरोत्तर प्रगती कशी होते याचा उलगडा करण्याचा तो प्रयत्न करतो.

त्याच्या मते ज्यांतून चैतन्यच हळूहळू विकसित झाले आहे असे निसर्गाचे स्वरूप मानले आणि या रीतीने निसर्गाच्या अंतरंगातूनच त्याचे निरीक्षण केले तरच त्याचे खरे स्वरूप आपणास समजू शकेल. केवळ बाह्य व इंद्रिय प्रत्यक्ष दृष्टीकोन स्वीकारल्यामुळे न्यूटनने व बॉइलने पदार्थविज्ञानाची व व बेकनने तत्वज्ञानाची हानी केली. केवळ गणितावर आधारलेले खगोलशास्त्र आकाशातील गोलाच्या गतीचे खरे स्वरूप सांगू शकणार नाही. इंद्रिय प्रत्यक्षतावादी असा निसर्गाचा अभ्यासक हा निसर्गाच्या दृश्याच्या सांकेतिक अर्थगर्भ महत्वाकडे न पहाता केवळ बाह्य दृश्य चिन्हांकडेच पहातो व











राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्याने स्पष्टीकरण केले म्हणजे निसर्गाचे सर्व रूपच स्पष्ट होते असे मानतो. परंतु हे मानणे चूक होय. एका दृश्याने दुसऱ्या दृश्याचा उलगडा करणे एवढ्यावर न थांबता सर्व दृश्य सृष्टीचे मूलतत्त्वच आकलन केले पाहिजे.

दृश्यसृष्टी ही केवल जड व यांत्रिक नसून तिच्या अंतर्यामीच्या जिवंत प्रेरणेने ती सजीवच आहे. हा अंतर्गत जीवनप्रवाह निरनिराळ्या टप्प्यात विकास पावतो. परस्परविरोधी द्वंद्वांतूनच संवाद निर्माण होतो. संवादातून पुन्हा नवीन द्वंद्वे व पुन्हा संवाद अशा क्रमातून दृश्यास जाणणारा मानव निर्माण होतो. मानवाच्या जाणीवेचाही असाच विकासक्रम असतो. त्या विकासाची परिणती विवेकबुद्धी नसून सौंदर्यबुद्धी होय. सौंदर्यबुद्धीनेच तो अखेर अंतिम तत्त्वाचा साक्षात्कार करून घेऊ शकतो.

जगत् आणि चैतन्य अगर द्रष्टा आणि दृश्य अथवा आत्मा आणि अनात्मा ही दोन्हीही अंतिम तत्त्वे नव्हेत. आत्म्यापासून अनात्मा अगर अनात्म्यापासून आत्मा निर्माण होतो असे म्हणता येत नाही. कारण दोन्हीही सापेक्ष असल्यामुळे एकाचे अस्तित्व दुसऱ्याशिवाय असूच शकत नाही. मूलतत्त्व हे दोन्हीच्या पलीकडचे आहे. त्या ठिकाणी आत्मा व अनात्मा, द्रष्टा व दृश्य अगर चित् व जड दोन्ही ऐक्य पावतात. या मूलतत्त्वास शेलिंगने प्रथम निर्गुण असे म्हटले. पुढे त्यास त्याने चिच्छक्ति म्हटले व शेवटी इच्छाशक्ति म्हटले आहे. म्हणजे निर्गुण सत्तेपासून तो पुढे सगुण परमेश्वराच्या कल्पनेपर्यंत पोहोचला. अंतिम स्वरूपाच्या अनुभूतीस बुद्धी उपयोगी पडत नसून सौंदर्यभावना साहाय्य करते. कला म्हणजेच धर्म अगर दैवी स्फूर्ती होय. याप्रमाणे शेलिंगने निसर्गाचे उदात्त स्वरूप दाखविले आहे व त्या दृष्टीने येऊ शकणाऱ्या मानवी जीवनातील उदात्त अनुभूतीची सीमारेषाही रंगविली आहे.

---


प्राज्ञपाठशाला-मण्डळ-ग्रंथमाला

**धर्मकोश**

## संस्कारकाण्ड

**भाग १ ला**

**सुपररॉयल साइज, पृष्ठसंख्या ९००, किंमत ४५ रु.**

संस्कारकाण्डाचा प्रथम भाग प्रकाशित झाला आहे. या भागांत संस्कारांसंबंधीं सामान्य विचार, गोत्र, प्रवर व सापिण्डय यासंबंधीं विस्तृत शास्त्रार्थ, विवाहकाल, विवाहाचे प्रकार इत्यादि विषय आलेले आहेत. धर्मशास्त्राचें आधुनिक पद्धतीनें संशोधन करणाऱ्या संशोधकांस व प्राचीन पण्डित-याज्ञिक यांसही हा भाग अत्यंत उपयुक्त असल्यामुळें संग्राह्य आहे.

मिळण्याचें ठिकाण— प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

[ जि० सातारा ]









अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## वाचकांचा पत्रव्यवहार –

नवभारत ऑगस्ट १९६७ अंकामध्ये डॉ. बडवे यांनी एका दीर्घ शीर्षकाखाली विस्तृत लेख लिहून हिंदु समाजाच्या पीछेहाटीची, अवनतीची वा अपकर्षाची मीमांसा केली, ती विचारार्ह आहे. याविषयासंबंधी त्यांनी आपले अज्ञान प्रगट केले असून या विषयाला चालना मिळावी, चर्चा व्हावी असे आस्थेने सुचविले आहे, त्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

या विषयाची चर्चा महाराष्ट्रात अगदी प्रथम इतिहासमहर्षी विसुभाऊ राजवाडे यांनी ४५ वर्षापूर्वीच केली आहे. अभ्यासूंनी राधामाधव विलासचंपु प्रस्तावना पाने १४९ ते १६९ व शेवटची स्मरणी पाने १९८ ते २०१ अवश्य अभ्यासावी– "शिवकालीन समाजरचना हा त्यांचा प्रबंध– राजवाडे लेखसंग्रह भाग ३ पाने ११५ ते १८५ पाहावी. महिकावती वा माहीमची बखर पाने ९० ते १०० पाहावी. पान ९६ वर ते म्हणतात– हिंदु समाज सुस्तद्वारी, तुटक, संन्यस्त, व उदासीन होता. त्याची कारणे देऊन तेथे उपायही, त्या द्रष्ट्याने सुचविले आहेत. हिंदुसमाजाची राष्ट्रपराङ्मुखता नष्ट होण्यास येथील लोकसंख्या तिप्पट व्हावी. राहाणीचे मान वाढावे व अन्नाची दुर्मीळता व्हावी : इत्यादि. संताळ्यांनी देश बुडवला, टाळकुट्यांनी धर्म बुडविला इ. विधाने त्यांनीच प्रथम बेधडक केली. त्यातील – संतांचे गुणही त्यांनी मान्य केले. न्या. मू. रानडे यांच्या Rise of the Maratha power या ग्रंथाने संत कार्याचा उत्कृष्ट समन्वय केला आहे. असो. त्यानंतर १९२० साली राजकारणात गांधींचा उदय झाला. त्यांनी हिंदु-मुसलमान ऐक्याशिवाय स्वराज्य नाही अशी आरोळी ठोकताच मुसुलमानांच्या दंग्यांना ऊत आला. मोपल्यांचे बंड, कोहाट, साहाराणपूर, गुल्बुर्गा, दावणगिरी इत्यादी ठिकाणच्या मुसलमानांच्या दंग्यामुळे काँग्रेसपुढाऱ्यांचेही लक्ष हिंदुसमाजाच्या दौर्बल्याकडे वेधले गेले व श्रद्धानंदांच्या हत्येमुळे शुद्धि, संघटण, अस्पृश्यतानिवारण, हिंदुसमाजबलवर्धनाची चळवळ, हिंदुसभेच्या द्वारे व अन्य अनेक मार्गांनी ती फोफावली. त्याच कालामध्ये महाराष्ट्रातील पंडित व काशीचे पंडित यांच्यामध्ये धर्म व समाजसुधारणेसंबंधी वाद, चर्चा झाल्या व महाराष्ट्रिय पंडित परिवर्तनवादी म्हणून पुढे आले व त्यांनी धर्म, समाज, संस्कृतिदृष्ट्या हिंदुसमाजाचा खोल अभ्यास करून ग्रंथसंपत्ती निर्माण केली. धर्मशास्त्रविचार– म. म. काणे, धर्मविवाहस्वरूप –पं. दप्तरी, संस्कृतिसंगम– द. के. केळकर, हिंदुधर्मसमीक्षा– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री, हिंदूंच्या अवनतीची मीमांसा प. कोकजेशास्त्री, आर्य संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष, हिंदुसंस्कृती प्रदीप, हिंदुसमाज समर्थ कसा होईल. ले. दिवेकरशास्त्री पं. दिवेकरांचे सर्व ग्रंथ जळले ते सोडून बाकीचे विकत मिळतात. अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ पं. पाठक शास्त्री इत्यादी ग्रंथ प्रसिद्ध झाले व मोठ्या हिरीरीने त्यांचा प्रचारही झाला. पं. चित्रावशास्त्री व लक्ष्मणशास्त्री यांनी शुद्धिसंस्कार व शुद्धिसर्वस्व प्रसिद्ध केले हा सर्व उद्योग गांधी वधापर्यंत व्यवस्थित चालू होता. पुढे हा वर्ग जातीय ठरला, त्यांची घरे जळली, कोणाचे मुडदे पडले तर कोणाला धमक्या मिळाल्या. शेवटी स्वातंत्र्य आले व आपले सरकार आले म्हणून हिंदुत्वनिष्ठांची चळवळ थंडावली. डॉ. बडवे यांनी स्वातंत्र्यानंतर २० वर्षांनी पुनः या विषयाला तोंड फोडले ते उत्तम केले. इतके सांगून त्यांच्या लेखातील काही विधानांचा थोडक्यात परामर्श घेतो.

### प्रथम बौद्धक्रांतीने प्रज्ञाहत केले

भारतीय वैदिक समाजाला सर्वव्यापी बुद्धक्रांतीने प्रथम हतप्रभ करून प्रज्ञाहत केले. दुःखं शून्यं, क्षणिकं, हे तत्त्वज्ञान अहिंसा व अप्रतिकार ही नीति यांचा पगडा समाजावर बसला. मुसलमान आक्रमक आले ते क्रौर्य, कपट, विश्वासघात, कत्तल या चतुष्टयीनेच आले. इतिहासकार सरदेसाई यांचे हे निगमन आहे. मुसलमानांना विजय मिळण्यास बौद्धधर्मानेच मोठी अनुकूलता करून ठेवली होती. एक स्वार्थ किंवा परमार्थ म्हणजे भिक्षु अगर संन्यासी होणे येवढेच समाजाला माहीत होते. समाजधर्म, समष्टिधर्म, राष्ट्रधर्माचा गंधही नव्हता. काहींना तर आजच्या सर्वोदयवाद्यांप्रमाणे किंवा मानव्यवाद्याप्रमाणे विश्वबंधुत्वाची मरगळ आली होती. तो रोग आजही आहे. दुर्बलांनी मानव्य, विश्वबंधुत्वाच्या गप्पा मारू नयेत, हे आजही समजले जात नाही. त्या काळात सर्व समाज बुद्धाळलेला होता. आजचे






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपले सरकारही त्याला अपवाद नाही. तात्पर्य बुद्ध-धर्मांच्या क्रांतीने समाज मुक्तद्वारी, तुटक, संन्यस्त, उदासीन, अप्रतिकारी व अहिंसावादी बनला होता. चिं. वि. वैद्यांच्या मध्ययुगीन भारतामध्ये ही मीमांसा मोठी उत्तम केली आहे. बौद्ध तत्त्वज्ञान दुःखं, शून्यं, क्षणिकं, याचा पगडा समाजावर बसला. व समाज मुक्तद्वारी बनला. दुःखमय जगतात वा देशात कोणी आले तर दुःखातच पडणारे. खुशाल येवोत व पडोत. बुद्ध भिक्षूंना शंकराचार्यांनी तोडीस तोड दिली व वैदिक संन्यासी उत्पन्न केले. पण भिक्षूच्या जागी संन्यासी आल्याने संन्यस्त व तुटकवृत्ति वाढली. समाजाचे ध्येय गृहस्थाश्रमी कर्ते पुरुष हे नष्ट झाले. कारण शंकराचार्यांनंतर वर अन्य मतांचे आचार्य संन्यासीच पुढे आले. शांकरवेदांतातील जीव ब्रह्मैक्य हे समजणे, व पचविणे अत्यंत कठीण होते. पण दुःखं, शून्यं, क्षणिकं याचेच रूपांतर जगत् मिथ्या व माया हे मात्र समाजात रुजले व समाज इहलोका-विषयी उदासीन झाला. भिक्षूनंतर संन्यासी व त्यानंतर साधुसंत पुढे आले. साधुसंतांची शिकवण समजण्याची पात्रता समाजाला नसली तरी एक ईश्वर व त्याची भक्ति त्याना समजली. अर्थात एका ईश्वरावाचून अन्य समाज व राष्ट्र यांचे अगत्य वाटण्याचे कारण राहिले नाही. म्हणून समाज अभ्युदयपराङ्मुख बनला. सत्पुरुषांच्या जागी अलीकडे बुवा, संत, महाराज आले व त्यांनी समाजाला प्रज्ञाहत केले. प्रज्ञाहत करण्याची ही परंपरा दीर्घकालीन आहे. मधून मधून प्रज्ञाप्रखरपणा चंद्रगुप्त, आर्य, चाणक्य, शिवाजी, रामदास काळात दिसला. त्याने पुष्कळ काम केले. पण अडाण्यांची संख्या प्रचंड व जाणते थोडे असे झाल्या-मुळे समाजात मुरलेले दोष नष्ट झालेले नाहीत. फार काय पण आजच्या राजकारणातील पुढाऱ्यातसुद्धा प्रज्ञाप्रखरपणा नाही व नव्हता. तो असता तर गांधीजी फाळणीला कधीच मान्यता न देते. व नेहरूंनी तिबेट देश घालविला नसता. गांधी व नेहरू यांचेपुढे प्रज्ञा-प्रखरता ज्यांनी दाखविली ते जातीय ठरले, अराष्ट्रीय ठरले व ज्यांनी त्यांच्याशी सोयिस्करपणे मतैक्य म्हणून बुद्धीची प्रतारणा केली ते संपत्ती व मानाने समृद्ध झाले. असा हा प्रज्ञाहतपणाचा आजवरचा इतिहास आहे. ( हिंदु संस्कृति प्रदीप पान २७२।२७३ पहा. )

### भक्तीविषयी अपसमज

जगत् चालक एक सर्वज्ञ, सर्वशक्तिमान शक्ति तीच ईश्वर, त्याची स्वकर्म कुसुमाने पूजा करावी असे गीता सांगते. भक्ती करणाऱ्याप्रमाणे कर्तव्य करणाऱ्यालाही देव भेटतो; तो प्रसन्न होतो, हे तत्त्व आज डावलले गेले आहे. नभोवाणीवरून पुंडलिकाचे आख्यान वरचेवर कीर्तन-कार सांगतात पण पुंडलिकाने भक्ति केली नव्हती तर आईबापाची सेवा हे कर्तव्य केले. कर्तव्य करणाऱ्याला देव पावतो, स्तुति ही भक्ती नसून कृती-कर्तव्य ही भक्ती आहे. असे आजही सांगत नाहीत. शालि-ग्रामावर विष्णूची भावना करून जर भक्ती केली तर जसा विष्णु प्रसन्न होतो तशीच आईबाप हे ईश्वराचे प्रतीक, नवरा, गुरु हेही ईश्वराचे प्रतिनिधि समजून जर पुत्राने; पत्नीने व शिष्याने कर्तव्य केले तर देव प्राप्त होतो हे शास्त्रीय सत्य लोपले आहे. गुरुचरित्र अ० २ मध्ये दीपक शिष्याची उत्कट गुरु सेवा सांगितली आहे. ती ऐकून शंकर व विष्णु त्याला वर देण्यास आले. दीपक म्हणतो मी तुम्हाला बोलावले नव्हते तुम्ही का आला ? वर देणारच तर गुरुसेवा घडावी हाच वर द्या असे तो म्हणाला. पुंडलिकानेही देवाला तेच सांगितले की आलाच आहेस तर विटेवर उभा राहा. मला आईबापांच्या सेवेशिवाय अन्य कर्तव्य नाही. Duty is deity and service is worship हे पचविणे भाग आहे. सर्व-समर्थ ईश्वराची सेवा कर्तव्यानेच होते. राष्ट्रदेवोभव, हे टिळकांनी शिकविले. राष्ट्र हे ईश्वरप्रतीक समजून ईश्वराची सेवा प्रत्येक नागरिकाने केली पाहिजे. सेवा, भक्ति, दास्य यांना बुजण्याचे कारण नाही. समर्थ रामदास व श्री मारुतिराय ही मोठी दास्यभक्तीची उदाहरणे होत. उत्तरेकडून येणाऱ्या मुसलमानांच्या आक्रमणाला टक्कर देणारे रामदास म्हणतात--

दाता एक रघुनंदन । वरकड लंडी देईल कोण ॥
म्हणोनि आम्ही रामदास । रामचरणी आमचा विश्वास

--आकाश कोसळले तरी आम्ही अन्याची वास पहाणार नाही. म्लेंच्छ दुर्जन उदंड बहुत दिवसांचे बंड । माजले ते मोडून काढण्याकरिता समर्थी धारिष्ट धरा व अद्भुतचि कार्य करा असे शिवाजीराजांना सांगणारे रामाचे दास म्हणूनच ते समर्थ झाले. रामाच्या दास्य भक्तीने समर्थ झालेले दुसरे भक्त मारुतिराय होत.









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समर्थांनीं गावोगावी हे बलाचे दैवत स्थापिले व बलोपासना सुरू केली. बुद्धिमंतामध्ये वरिष्ठ, जितेंद्रिय मारुतिराय होते म्हणूनच रामाचे रामायण झाले. अब्रू वाचली. राज्य व बायकोही मिळाली. धन्य धन्य ते रामदास्य ॥

## ज्ञानादेव तु कैवल्यं

मोक्षाविषयी डॉ. बडवे यांनी लिहिलेले अशास्त्रीय कसे आहे हे दाखवून हे पत्र पुरे करितो. ज्ञानानेच मोक्ष, ज्ञानानेच पारतंत्र्य, मूर्खपणा, अज्ञान व तज्जन्य आपत्ती यांतून मोक्ष होतो. अज्ञान हेच बंधन व ज्ञान हाच मोक्ष ! मी ब्रह्म आहे. पिंड ब्रह्मांडामध्ये एकच तत्त्व आहे व हा तीन्ही शरीराव्यतिरिक्त 'मी' ब्रह्म आहे. हा सिद्धान्त समजण्यास व पचण्यास पल्लेदार बुद्धी पाहिजे. शांकर वेदान्त चांगल्या जाणत्यांनाही आकलन होत नाही. त्याला डॉ. बडवे अपवाद नाहीत. मोक्ष हा उत्पाद्य, आप्य, संस्कार्य विकार्य नाही. तो स्वतः सिद्ध आहे फक्त जाणावयाचा आहे. " तत् त्वं असि, तूं तें ब्रह्म आहेसच. न त्वं मृत्यौ भविष्यसि, मोक्ष मेल्यावर नाही. जिवंतपणीचे ज्ञान होताच मोक्ष आहे. कर्मकांड, जपजाप्य योगयोगांच्या कचाटीतून सोडविणारे एक ज्ञानच होय. हा ज्ञानाचा " जीव ब्रह्मैक्याचा, सिद्धान्त श्रीआचार्यांनी मांडला. त्या ज्ञानाकडे दुर्लक्ष करून अडाणी समाजाने फक्त जगन्मिथ्यात्व पत्करले. आचार्यतत्त्वज्ञानाची ही विटंबना होय.

— महादेवशास्त्री दिवेकर

---

संपादक नवभारत यास

स. न. वि.

आगस्ट १९६७ च्या अंकात डॉ. र. चिं. बडवे यांचा " ज्ञानाला भक्तीचे ग्रहण, व त्याचे सामाजिक दुष्परिणाम " हा विचारप्रवर्तक जो लेख प्रसिद्ध झाला आहे, त्यात हिंदूच्या क्लेशदायक पर्वाला सुरुवात केव्हा व कशी झाली यासंबंधी चिकित्सा करण्याचा जो प्रयत्न केला आहे तो मनःपूर्वक दिसत नाही. भीतभीत केलेला उघड दिसतो. सध्या भारतास स्वातंत्र्य प्राप्त झाले आहे. हे स्वातंत्र्य सर्व प्रकारांनी व्हावे. व अक्षय्य टिकावे म्हणून या वेळेस प्रत्येक विचारी भारतीयाने मागील दोषांची निर्भीड, व न्यायनिष्ठुर चिकित्सा करून ते दोष काढून टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे. "विवेके क्रिया पालटावी" हा समर्थांचा उपदेश आहे.

' ज्ञाना ' ला भक्तीचे ग्रहण लागल्यामुळे भारताची पीछेहाट झाली. त्यास अनेक शतके गुलामगिरी पत्करावी लागली. हा जो निष्कर्ष त्यांनी काढला आहे तो अर्धवट खरा आहे. हिंदूंना प्रज्ञाहत करणाऱ्या दोषांचा जर खरोखर व न्यायतः शोध करीत गेलो तर ते लोण ' शंकराचार्यां'पर्यंत न्यावे लागते. तत्पूर्वी जैन बौद्ध संप्रदाय अहिंसावादीच झाले होते. डॉ. बडवे समजतात " जीव म्हणजे मूलतः ब्रह्मच ' हा शंकराचार्यांचा सिद्धान्त फार ओजस्वी होता. पण वस्तुतः तोच अत्यंत प्रज्ञाहत करणारा अनुभवास आला ! यासंबंधी इतिहासाचार्य कै. वि. का. राजवाडे काय म्हणतात, ते त्यांच्या शब्दातच मी देतो. ऐतिहासिक प्रस्तावना या त्यांच्या पुस्तकाच्या ३४० पृष्ठावर ते लिहितात : " युरोपात ऐतिहासिक तत्त्वज्ञानाच्या, ज्या ' अनुनायक, ' व ' निर्णायक ' नावाच्या दोन शाखा आहेत, त्यापैकी ' अनुनायक ' पद्धतीचा उदय भारतवर्षात व महाराष्ट्रात अद्याप झाला नाही. ' निर्णायक ' अथवा A priori अथवा Diductive अथवा पूर्वग्रहात्मक पद्धतीचेच राज्य या देशात आज दोन हजार वर्षे चालू आहे ! भारतवर्षातील ऐतिहासिक निर्णायक पद्धतीच्या दोन शाखा आहेत. सर्व चराचर सृष्टीशी समबुद्धी ठेवून चालणारी. यात अश्म, कांचन, पशु, पक्षी, मनुष्य, गंधर्व, यक्ष, ईश्वर व ब्रह्म यांचे तादात्म्य करून व्यक्तिमात्राचे आचरण चालावे. असा उपदेश केलेला असतो. प्रपंचात, जन्मावे लागते, त्याला उपाय नाही. परंतु जन्म हे महत् दुःख कल्पून प्रपंचाचा म्हणजे समाजाचा स्पर्श अपरिहार्य म्हणून, देहाचा त्याग करून ब्रह्मात विलीन होण्यातच पुरुषार्थ आहे. म्हणजे प्रपंच संसार, समाज, समाजाची धडपड, राष्ट्र, राज्ययंत्र, धर्मयंत्र, युद्धयंत्र, व्यक्तिस्वातंत्र्य, समाजस्वातंत्र्य, वगैरे सर्व संस्थांचा, व व्यवहारांचा पूर्ण तिटकारा यांच्या वेदान्तात भरलेला असतो. ' ब्रह्मा'त विरून जाण्याला ( जिव शिव ऐक्य ) सर्व चराचर सृष्टीशी समबुद्धि ठेवणे म्ह० व्यक्तित्वाचा अत्यंत लोप









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करणे ! व्यक्तित्वाचा अत्यंत लोप म्ह० समाजाचाही अत्यंत लोपच होय.

या वेदान्त्याना ममत्वबुद्धी आरम्याच्याही ठायी राहिलेली नको. 'ज्ञान' व 'अज्ञान' या दोन्ही गोष्टी सारख्याच सिद्ध व असिद्ध परस्परविरुद्ध हे लोक एकच समजतात. या मताचा कट्टा पुरस्कर्ता महाराष्ट्रात 'ज्ञानेश्वर' झाला. त्यांच्या अमृतानुभवात अज्ञानाबरोबर 'ज्ञाना'चेही त्यांनी खंडन केले !

'शिष्य म्ह० गुरु,' गुरु म्ह० शिष्य, बायको म्ह० आई, आई म्ह० बायको, पुरुष म्ह० प्रकृति, प्रकृति म्ह० पुरुष, आपण म्ह० ईश्वर, ईश्वर म्ह० आपण. इतकी व्यष्टि, समष्टींची जेथे तादात्म्य स्थिती झाली, तेथे देश कसला व इतिहास कसला ? "

उतारा थोडा लांबला. पण इतिहासाचार्यांनी निदान बरोबर काढले. असेच म्हणावे लागते. शेवटच्या ओळी टिंगल करणाऱ्या आहेत. पण वेदान्ताचा परिणाम झाला हे खरे आहे ! राजवाड्यांनी यात ज्ञानेश्वराला दोषी ठरविले आहे. पण 'ज्ञानेश्वर' झाले तरी ते शंकराचार्यांचाच अनुवाद करतात. हे विसरता येत नाही.

आचार्य 'ज्ञाना'ला महत्त्व देतात "ज्ञानादेव तु कैवल्यम" हे त्यांचे वाक्य प्रसिद्धच आहे. 'ज्ञानेश्वर' याच्यापुढे जाऊन 'अज्ञाना' बरोबर 'ज्ञाना'चे ही खंडन करतात. पण श्री शंकराचार्यांना 'ज्ञान' या शब्दाने 'ब्रम्हसत्यम् जगन्मिथ्या हे जाणणे म्हणजे ज्ञानच इतर सर्व अज्ञान ! आचार्यांच्या मते देश राष्ट्र, इ. सर्व जगत् मिथ्या मृगजलवत. ते सर्व 'अज्ञान' 'असत्य' अविद्या अशा 'ज्ञानाला' फुंकर घालून डॉ. बडवे भारताला इतर प्रगत राष्ट्राबरोबरीचे कधी तरी करू शकतील की ? तेव्हा अद्वैत वेदान्तज्ञानावर भक्तीचे कलम झाले ते त्याच झाडाच्या जातीचे म्हणूनच झाले. भक्तिमार्गाने भलताच विपर्यास केला ! व विठोबाला बादशहाची हजामत करण्यास लावले ! व सजन कसायाचे मांसही विकावयास लावले !

– वा. दा. गाडगीळ

---

चुकीची दुरुस्ती–

स. न. वि. वि.

"नवभारत"च्या ऑगस्ट १९६७ च्या अंकात श्री. सेतुमाधवराव पगडी यांचा "गुलशने अजाइब" (निजामुलमुल्काची अप्रकाशित पत्रे) हा लेख प्रकाशित झाला आहे. त्यात पुढील वाक्य अनवधानाने राहून गेले आहे.

"सदर हस्तलिखिताची फोटोप्रत मला उपलब्ध करून दिल्याबद्दल मी मुंबईच्या सरकारी दप्तरखान्याचा आणि त्याचे संचालक डॉ. मो. गं. दीक्षित यांचा अत्यंत आभारी." – लेखक



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## पुस्तक परीक्षण –

**इतिहासाचे तत्त्वज्ञान :** ले. प्रा. सदाशिव आठवले, प्रका. प्राज्ञपाठशाळा मंडळ. वाई, पृ. २११ किं. ५ रु.

सन १९४६ ते १९६३ या काळात ज्या विषयावर इंग्रजी हजारांवर पुस्तके झाल्याची नोंद आहे, त्या विषयावर मराठी पुस्तक प्रा. सदाशिवराव आठवले यांनी लिहिले. ही मोठी तारीफ होय. "इतिहासाचे तत्त्वज्ञान" असे त्यांनी आपल्या पुस्तकास म्हटले असले तरी एकंदरीने इतिहासशास्त्र, इतिहास कसा लिहितात, या बद्दल ही चर्चा समजावी. इतिहास-लेखकाची तयारी किती असावी, त्याने किती गोष्टींचा विचार केला पाहिजे इत्यादी पथ्यापथ्यांचा विचार अशा विवेचनात येतो.

ह्या अभ्यासात उपलब्ध इतिहास-ग्रंथांची छाननी-इतिहासकाराच्या मनोभूमिकचे विश्लेषण आपाततः समाविष्ट असते. प्रा. आठवल्यांच्या ह्या प्रयत्नात अशा प्रकारची छाननी– असले विश्लेषण आले आहे. पण इंग्रजी ग्रंथकारांची मते प्रथम सांगून त्यावर साधकबाधक चर्चा अधिक आहे. त्या चर्चेमुळे अनेक ग्रंथांचा अभ्यास सहज साधतो– त्यांच्या प्रति-पादनाची ओळख होते आणि प्रा. आठवले यांनी काही मुद्दे कसे कौशल्याने खोडून काढले हे कळते– आणि अभ्यासाचे कौतुक वाटते. म्हणून हे पुस्तक म्हणजे अनेक ग्रंथांचे सार आहे. विख्यात लेखकांचा परिचय या एका ग्रंथावरून होतो– आणि विषयप्रति-पादन, मतखंडन, युक्तिवाद इत्यादी गुणांची ओळख पटते.

### ग्रंथस्वरूप

अकरा प्रकरणात इतिहास–शास्त्राचा प्रपंच थाटला आहे. अर्थ, प्रकार, व्याप्ति ह्या पहिल्या प्रकरणानंतर कालचक्र, ईश्वरी (योगायोगाचे) सूत्र ह्या विचाराचा परिचय होतो. तिसरे प्रकरण वंश-श्रेष्ठतेच्या सिद्धांता-बद्दल आहे. राष्ट्रीय अवतारकार्याचे तत्त्वज्ञान हे चौथे प्रकरण. पाश्चात्य भूगोल-निष्ठ विवरणावर भर आहे. सांस्कृतिक–सामाजिक–आर्थिक, गतिनियमांवर इतिहासाचा ओघ कसा अवलंबून असतो हे ६–७ या दोन प्रकरणात दाखविले आहे. म्हणजे ज्या त्या विद्वानांच्या विविध मतामतांची ओळख करून दिली आहे. महापुरुषांमुळे इतिहासावर कोणते परिणाम होतात, स्थित्यंतराचे वास्तविक स्वरूप, ह्या दोन प्रकरणा-(८–९) नंतर दुरुपयोग–सदुपयोग ही अखेरची दोन (१०–११) प्रकरणे येतात. 'सूचि' हा शेवटचा भाग आहे. पुस्तकाची यादी प्रत्येक प्रकरणाचे अखेरीस छापली आहे. अभ्यासकांस ही अधिक उपयुक्त वाटावी अशी ग्रंथकाराची अपेक्षा असल्याने विविध इंग्रजी लेखकांचा परिचय, त्यांच्या ग्रंथाचे नाव, प्रकाशनवर्ष, ही माहिती मिळते.

एकंदर विवेचनाचा रोख आमच्या इतिहासकारांना, वाचकांना विचाराला प्रचोदित करण्याचा असल्याने, पुस्तक वाचनीय झाले आहे. नव्या ग्रंथातले नवे मत समजल्याचा आनंद होतो- एवढ्यात त्या मताची छाननी वाचता येते. मंडन- खंडन– चातुर्याचे कौतुक वाटते आणि आता आणखी कुणा विद्वानाचे मत वाचायला मिळते– त्याचा परामर्श प्रा. आठवले कसा घेतात– हे कुतूहल वाढत जाते. चांगल्या पुस्तकाचा हा निकषच नव्हे काय ?

### इतिहासकार तरी कुठे आहेत ?

जिज्ञासू वृत्तीने हे पुस्तक वाचल्यावर वाटते, आपणाकडे ह्याविषयी अद्याप कुणीच कसे फारसे लिहिले नाही ? वास्तविक पहाता महाराष्ट्रात ऐति-हासिक साधनांचा संग्रह इतर राज्यांना हेवा वाटावा एवढा व्यापक आहे. इतिहास घडविणाऱ्या पुरुषांची आठवण सारखी होत रहावी अशा वास्तू अद्याप पहावयास मिळतात. आमच्या पूर्वजांनी जे पराक्रम गाजविले, त्यांची आठवण आम्हास तर होतेच– पण इतरांनाही होते– ते आमचे कौतुक त्यामुळे करतात– त्या पराक्रमांच्या आठवणीमुळे आम्हास आजही मोठेपण लाभते. तरी आमचा संगतवार इतिहास लिहिणारे वीर आमच्यात अद्याप निपजले नाहीत. नाही म्हणायला रियासतकार सरदेसाई यांचे कार्य अपूर्व आहे–आजपर्यंत अद्वितीय आहे. पण आम्ही तर त्यांना "इतिहासकार" म्हणायलाही तयार नाही !! त्यांच्यासाठी आम्ही "संकलनकार" हा नवा लेखक-वर्ग काढला. अशी दुरवस्था का झाली ?





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि इतिहास लिहिले नाहीत–इतिहासकार निपजले नाहीत–तर त्या लेखनाचा, लेखकांच्या विविध गुणावगुणांचा विचार करण्याची गरज आम्हास भासावी कशी ? इतर भारतीय भाषातील एतद्‌विषयक ग्रंथांची-ग्रंथाभावाची–अवस्था अधिक शोचनीय असावी. कारण आधी " इतिहास " असला पाहिजे. त्या इतिहासाचे पुरावे, तो लिहिण्यासाठी साधने हवीत. मग लेखक निघण्याची शक्यता. असो.

## स्वाभिमान–इतिहास साहचर्य

पहिल्या प्रकरणात एक वादग्रस्त प्रश्न चर्चिला आहे : इतिहास लेखन–कथनातला हेतु. (पृ. १०-११) " स्वाभिमानासाठी इतिहास नाही " असे (पृ. ११) प्रा. आठवले म्हणतात. परंतु ते पटत नाही. स्वाभिमानाखेरीज इतिहासाला महत्त्वच नाही–असे म्हणता येण्याइतपत त्यांचे ( = स्वाभिमानाचे–इतिहासाचे ) साहचर्य आहे. नाही तर आमचा इतिहास आम्हीच का लिहावा ? किंबहुना इंग्लंडचा, जर्मनीचा, फ्रान्सचा, अमेरिकेचा ... इतिहास इंग्रज–जर्मन–फ्रेंच–अमेरिकन लेखकांनी लिहिलेला कशाला हवा ? कुणा एका निःस्पृह निर्भीड अशा फडर्या लेखकाने चारी देशांचे इतिहास लिहिले तर ते त्या त्या देशात मान्य ठरतील का ? हा मोठा वादग्रस्त विषय आहे आणि शेवटच्या दोन्ही प्रकरणांवरून " स्वाभिमानासाठी इतिहास नाही " या विधानाचे आपसूक खंडन होते. इतिहासाचे दुरुपयोग आणि सदुपयोग कोणते हे त्या दोन प्रकरणात सांगितले आहेत. त्याचा अर्थ असा की लेखकाचा हेतु असो वा नसो, इतिहास-लेखनाचे बरे-वाईट उपयोग " होतात. " त्या बऱ्या वाईट परिणामांपैकी स्वाभिमान-जागृति हा एक स्वाभाविकपणे असला पाहिजे. कारण " पूर्वजांची कीर्ति गाणे–सांगणे " हा पढतमूर्खपणा असला तरी तो करण्यात पुष्कळांना आनंद वाटतो– पुष्कळांचा अभिमान जागृत होतो. ह्या वादाबद्दल लिहिवे तितके थोडे असल्याने, त्याचा उल्लेख तेवढा केला. असो.

निरनिराळ्या लोकसमूहाच्या ऐतिहासिक गतिमानते-बद्दलच्या समजुती चांगल्या रीतीने पण थोडक्यात सांगण्यासाठी साक्षेपी वाचन झाले असल्याची प्रचीति मिळते. आणि त्यांचे मूल्यमापनही मोठ्या चतुराईने केले आहे. वंशश्रेष्ठत्वाचा सिद्धान्त पत्करून कुणी कुणी कस कसे " इतिहास " घडविले, हा ताजा इतिहासही दाखल्यासाठी घेतला आहे. वंशवादाविषयी अधिकृत निवेदने–सारांशरूपाने सांगितली खरी. पण ती इंग्रजी आहेत. त्यांचा मराठी अनुवाद–मथितार्थही दिला नाही. त्यांवरून अनुमान काढले ते मात्र स्पष्ट आहे: इतिहास समजण्यासाठी " वंशविचार " मान्य ठरत नाही. (पृ. ६१) राष्ट्रीय अवतारकार्याची कल्पना निरनिराळ्या राष्ट्रात कशी फैलावलेली असते हे दाखविताना प्रा. आठवले किती तर्ककर्कश आणि निर्भीड आहेत, याची खात्री पटते. ते विचारतात : " भारताचे असे वेगळे नैतिक मूल्य काय आहे ? आम्ही इतर राष्ट्रांपेक्षा नैतिकदृष्ट्या वेगळे, वरचे आहोत हे कशावरून ठरवावयाचे ? (पृ. ७३) अशा स्पष्ट आणि मूलग्राही छाननीमुळे सर्व विवेचन वाचनीय ठरते.

## देश–काल-ज्ञान हवे

भूगोलनिष्ठ चर्चा कोणकोणत्या स्वरूपात आतापर्यंत व्यक्त झाली त्याचा तपशील प्रा० आठवल्यांनी थोडक्यात पुरविला आहे. प्राचीन ग्रीक इतिहास–कार, मॉंटेस्क्यू (स. १६८९–१७५५) बकल (स. १८२१–६२) रॅटझेल, हंटिंगटन इत्यादिकांची याबाबत मते समजावून सांगितली आहेत. परंतु या पंडितांच्या नुसत्या नावावरून पुरेसा बोध होत नाही. शिवाय ह्या चारी विद्वानांची पुस्तके संदर्भसाहित्यात (प्रकरणाचे अखेरीस) नोंदलेली नाहीत. त्यामुळे हे विद्वान कुठले, कोणत्या काळात वावरले, त्यांनी ग्रंथ कोणते लिहिले, इत्यादी माहिती मिळाली तर त्यांच्या मताचे आकलन अधिक चांगल्या प्रकारे होईल. विशेषतः ' कालज्ञान ' आवश्यक आहे. मॉंटेस्क्यू हा आमच्या छत्रपति शाहूचा समकालीन असे समजल्यामुळे त्याचा अभ्यास किती पुराणा होता, हे कळते. आम्हास इतिहास–लेखनाचे महत्त्व पटलेले नव्हते– आमचे पूर्वज इतिहास घडवीत होते– तेव्हा हा फ्रेंच तत्त्वज्ञ, इतिहासाचे तत्त्वज्ञान सांगण्यास पुढें सरसावला ! ! अमेरिकन घटना–पंडितांवर त्याच्या मताचा पगडा होता–त्यामुळे अमेरिकन घटनेत अव्यवहारीपणा उतरला. आणि खुद्द मॉंटेस्क्यूचे हे घटनाविषयक ' ज्ञान ' गैरसमजावर






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आधारलेले होते-तरी ते अमेरिकनांनी " बाबा वाक्यम् प्रमाणम्' मानले, इत्यादी त्याच्याबद्दल माहिती समजल्याने, इतिहासात चुका कशा घडतात-अज्ञान कसे पसरते, याची प्रचीति आली. प्रा. आठवले यांनी ज्या ज्या विद्वानांची ओळख करून दिली आहे. त्यांचे त्यांचे नाव, गाव (?) व काल सांगणाऱ्या टीपा आवश्यक होत्या असे सुचवावेसे वाटते. सूचीत ग्रंथकारांची नावे वेगळ्या टाइपात छापली असती तर अधिक सोईचे झाले असते.

## टॉयनबी-मार्क्स-एंगल्स

स्पेंग्लर आणि टॉयनबी (ज. १८८९) यांच्या सिद्धान्ताची समीक्षा उद्बोधक आहे. " इतिहासाचा अभ्यास " तेरा खंडात प्रसिद्ध करणारा प्रकांड पंडित टॉयनबी याने २१ संस्कृतींचा अभ्यास केला. त्यात चुकीचे तपशील एकवीसशे असल्याचे सांगून (पृ.९९) त्याच्या देखील विवेचनातले दोष दाखविल्याबद्दल प्रा. आठवले, यांची पाठ थोपटली पाहिजे. परंपरा अशी की कोणातरी " साहेबाचे " नाव घ्यायचे, " त्याने सुद्धा " असे असे म्हटले म्हणून सांगायचे त्याची छाननी करण्याचे मात्र टाळायचे ! ह्या परिपाठाच्या वेगळ्यारीतीने प्रा. आठवले वागले- सर्व ग्रंथभर त्यांच्या ह्या " न्यायाच्या " वृत्तीचा दाखला मिळतो.

आर्थिक दृष्टीने इतिहासाचा " अन्वयार्थ" सांगणारे हेगेल (स. १७७०-१८३१), कार्ल मार्क्स (स. १८१८-८३) आणि एंगल्स- (स. १८२०-९५) यांनी आपापले विचार कसे मांडले ते सांगून प्रा. आठवले म्हणतात-" त्यांनी आर्थिक इतिहासाची रूपरेखा सांगितली तिचे तपशील मान्य करणे कठीण आहे (पृ. ११३) भांडवलदार-कामगार या दोन वर्गांचाच लढा होईल. (तिसरा पक्ष अवतरणार नाही ?) असे का मानावे ? आणि ह्या संघर्षात अमुक एका पक्षाची सरशी होईल अशी हमी मार्क्सवादी कोणत्या आधारावर देतात? मार्क्सवादी वैचारिक मानतात की स. १९१७ची रशियातली क्रांती लेनिनच्या पुढारीपणाशिवाय झाली नसती. पण एकाद्या पुढाऱ्याची असली कर्तबगारी मार्क्सवादी इतिहास-भाष्यात बसावी कशी ? कारण विशिष्ट परिस्थिती प्राप्त होताच तिला हवे तसे पुढारी आपाततः तयार होतात, हा मार्क्सवादी पंडितांचा दृढ विश्वास.

ही छाननी सडेतोड पद्धतीची- बिनतोड अशीही झाली असून डॉ. दामोदर धर्मानंद कोसांबी यांच्या इतिहास विवेचनातील काही विधानांचा खरपूस समाचार तीत घेतलेला आहे : (१) त्या काळची गरज म्हणून सम्राट अशोकाने पशुहत्येवर निर्बंध घातला; (२) फिरस्त्या व्यापाऱ्यांच्या सोईसाठी रस्त्याच्या बाजूस झाडे लावविली; विहिरी खोदविल्या; विरामघरे बांधविली (पृ. १२२). हे विवेचन का पटत नाही, हे सिद्ध करताना प्रा. आठवले विचारतात : पशुहत्याबंदीची गरज अशोकपूर्व किंवा अशोकोत्तर काळात कमी होती काय ? फिरत्या व्यापारी जनांची गरज अशोक-काळीच अधिक तीव्र भासली की काय ? अशा विचिकित्सक शंकांचे निरसन करून प्रा. आठवले यानी मार्क्सवादाचे खरे वैशिष्ट्य कोणते, त्याची मोहिनी बहुजनसमाजावर का पडते, हेही स्पष्ट सांगितले. इतिहासातून ईश्वराची उचलबांगडी मार्क्सने केली. " पिळून निघणारांचा अंतिम विजय " हा आशावादी, स्फूर्तिप्रद, चेतनादायक संदेश आहे, तरी देखील, मार्क्सवाद स्वीकारल्याने माणुसकी नाकारल्यासारखे होते, असे मत बर्ट्रांड रसेलच्या (ज. १८७२) आधारे प्रा. आठवले यांनी मांडले आहे. हा रसेल म्हणजे विख्यात गणितशास्त्रज्ञ; जागतिक तत्त्वज्ञानाचा इतिहासकार; मानवी ज्ञानाच्या मर्यादा सांगणारा; अणु-युद्धातील सामान्य-विचार पटविणारा आणि स. १९५० मध्ये साहित्यशाखेचे नोबेल बक्षिस पटकविणारा.

## संशयात्मा की विचिकित्सक ?

महापुरुषवादी इतिहासभाष्य अभ्यासताना सुद्धा विविध मतांचा परामर्श समर्पक रीतीने घेतला आहे. ऐतिहासिक पुरुषांना अवतार मानणे, हे एक टोक तर स्पेंगलर, सोरोकिन, मार्क्स, टॉयनबी प्रभृतींचे दुसरे टोकः त्यांना कर्तबगार पुरुष महत्त्वाचे वाटत नाहीत; परिस्थितीची "निकड" म्हणून ते " उद्भवतात " ही दोन्ही मते एकांगी आहेत. महापुरुषांमुळेच इतिहास घडत नसला, तरी तो घडविणाऱ्या अनेक घटकांपैकी महापुरुष एक आहे, हे खरे. मात्र " भूतकालाच्या











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बडणीचे श्रेय महापुरुषांच्या पदरात टाकून इतिहास सोपा करता येणार नाही" (पृ. १३९) असे प्रा. आठवले यांनी बजावले आहे.

प्राचीन इतिहास लिहिण्यासाठी साधने तुटपुंजी असतात. त्यावरून अनुमान काढू पहाणे रास्त नव्हे, असे सांगून प्रा. आठवले यांनी अशा अल्प-ज्ञानाचे एक उदाहरण दिले. चंद्रगुप्त मौर्यकालीन ग्रीक वकील मेगॅस्थिनीसने लिहिले आहे की भारतीय जनतेला चोरीची माहिती नाही–घरादारांना कुलूप लावण्याची त्यांची रीत नाही. ह्या निरीक्षणाची-निवेदनाची–छाननी करताना निष्कारण वकिली प्रश्न-केवळ वादासाठी–चर्चिले आहेत. मेगॅस्थिनीसने अशी किती घरे पाहिली ? किती जणांची ? किती ठिकाणची ? एकाच घरावरून त्याने हे विधान केले काय ? ज्या एकाचे घर त्याने पाहिले, तो विसराळू, माथेफिरू भणंगभिकारी ...... अशांपैकी नसेल कशावरून ? इत्यादी (पृ. १४५).

ही छाननी बुद्धिवादी, सत्यशोधकी किंवा विशेष चिकित्सक असेल कदाचित्. तिने तीक्ष्ण तर्कशक्तीचा पुरावाही मिळेल. पण मेगॅस्थिनीस 'खोटा' ठरणार नाही. आज मितीसही इराण–अफगाण लोकात कुलुपे न लावण्याची चाल आहे. त्यांची दुकाने रिकामी नसतात. त्यात मोहक जिन्नस, तोंडाला पाणी सुटेल असे खाद्य पदार्थ, मेवाजात (=फळफळावळ) रचलेली दिसत असते. दुकान बंद आहे, दुकानदार जवळपास नाही, हे दाखविण्यासाठी आडवी सुतळ बांधलेली असते. बाहेर हिंडणारे भुकेलेले असतात, तरी कुणी त्यातले फळ उचलीत नाही. हा अनुभव इराणी-अफगाण बाजारातून हिंडताना प्रत्यक्ष मिळालेला आहे. शिवाय मसूरी, सिमला, नैनीताल, दार्जिलिंग–फार काय नेपाळातील पहाडी प्रदेश ह्या हिमालयातील "शहरात" मुशाफिरांचे सामान चोरीस जात नाही-हा आजचाही अनुभव आहे. घर न सापडल्यामुळे सामान पोचविण्यास दीड दोन दिवस लागल्याची उदाहरणे आहेत. पण ते लंपे केल्याचे सहसा आढळत नाही.

चाणक्याने निरनिराळ्या चोऱ्यांसाठी निरनिराळ्या शिक्षा सांगितल्या आहेत, त्या काल्पनिक गुन्ह्यांसाठी नव्हत, हे खरे. पण त्या शिक्षांमुळे, किंवा काही अन्य कारणांमुळे असेल कदाचित्, समाजाची प्रगती झाली असली तरी ती मानली नाही म्हणून न मानणारा संशयात्मा ठरेल; झालेला फरक खोटा ठरणार नाही. धर्मशास्त्रानुसार विवाहाचे आठ प्रकार रूढ असता किंवा संततीचेही १२–१५ प्रकार नमूद असता, आज आपण त्याबाबत "प्रगती" करून काही थोड्याच प्रकारांना मान्यता दिली आहे. म्हणून सुचवावेसे वाटते की विचिकित्सक आणि संशयात्मा यांमध्ये तारतम्याने फरक जाणला पाहिजे. नाही तर शिलालेखांवर सदाचरणाची तत्त्वे कोरविणारा सम्राट अशोक "ढोंगी" ठरायचा. मोठमोठ्या लढाया मारणारा नेपोलिन "प्रचार–बहाद्दर" नव्हता कशावरून ? अशी शंका निघायची. असो.

इतिहासात रस असणारांना हा ग्रंथ आवडेल. विचाराचे मंथन वाढविणारी चर्चा त्यात आहे. अभ्यासाची दिशा त्यावरून कळते. अनेक इंग्रजी ग्रंथांचा, त्या त्या ग्रंथकर्त्या विद्वानांचा परिचय त्यावरून होतो, हा तर फार मोठा लाभ होय. थोडक्या अवकाशात, थोडक्या किंमतीत, सहज समजेल अशा भाषेत हे पुस्तक उपलब्ध करून दिल्याबद्दल लेखक-प्रकाशकांना धन्यवाद !

**– श्री. रा. टिकेकर**






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सार-संकलन

## आता झेकोस्लाव्हेकियाची पाळी

'खून म्हणजे मुस्कटदाबीची कमाल होय' हे बर्नार्ड शॉचे वाक्य वाटते तेवढे विरोधाभासी नाही. कारण ज्या दिवशी आपल्यावर टीका करणारांना नष्ट करण्याचे तंत्र युरोपिअन कम्युनिस्टांनी सोडून दिले त्याचवेळी अमूक इतक्या मर्यादेपर्यंतची टीका रास्त, त्यापलिकडची मात्र चालणार नाही अशी निश्चित रेघ ते ओढू शकले नाहीत. त्यामुळेच स्टालीनच्या मृत्यू-नंतर सुरू झालेल्या लेखनस्वातंत्र्याच्या लढ्यास कम्युनिस्ट आळा घालू शकले नाहीत. पोलंडमधल्या तरुणांचे अनुकरण हंगेरीत केले गेले, आता झेक तरुणांनी उचल खाल्ल्याच्या बातम्या येऊ लागल्या आहेत. फॅसिस्ट राजवटीप्रमाणेच झेक सरकार व झेक कम्युनिस्ट पक्ष झेक लेखकांची छळवणूक करीत आहे असा तेथील बुद्धिवाद्यांचा दावा असून त्यांच्या स्वातंत्र्यलढ्यास पाश्चिमात्य लेखकांनी पाठिंबा द्यावा अशी विनंती लंडनपर्यंत पोचली आहे. या जाहीर विनंतीवर ४५७ झेक लेखक, कलाकार व शास्त्रज्ञ यांच्या सह्या आहेत असेही अधिकृत रीत्या समजते.

## रशियातील लेखन स्वातंत्र्य

झेकोस्लाव्हेकियातील या स्वातंत्र्यलढ्याचा अर्थ समजण्यास मॉस्कोत घडलेल्या तीन गोष्टींकडे वळावे लागते. पहिली म्हणजे इल्या हेरेनबर्ग या सुप्रसिद्ध रशियन कादंबरीकार व प्रचारकाचा मृत्यू. हा लेखक स्टालीन युगात जगला. त्याकामी विरोध करणे म्हणजे आत्महत्याच होती. त्यातूनही तो वाचला. त्याचा उत्कर्ष झाला असेही म्हटले जाते परंतु स्टालीन नंतरच्या काळात प्रसिद्ध झालेली त्यांची कादंबरी 'हिमद्रव' (The Thaw) म्हणजे या युगात लेखकांना मिळालेल्या स्वातंत्र्याचे प्रतीक होती. दुसऱ्या दोन गोष्टी या स्वातंत्र्याच्या मर्यादा स्पष्ट करण्यास पुरेशा आहेत. एक म्हणजे अँड्री व्हेझ्नोस्की याला प्रवदाने नाकारले. हे पत्र पाश्चिमात्य वर्तमान पत्रात छापल्याबद्दल दोष देण्यात आला. या पत्रात आपल्याला रशियन अधिकारी बाईटरीत्या वागवीत आहेत अशी तक्रार आहे. दुसरी गोष्ट म्हणजे सिन्यान्हास्कि व डॅनियल यांच्यावर झालेल्या खटल्या-विरुद्ध आवाज उठवल्याबद्दल तीन रशियन लेखकांवर खटले होऊन त्यातील एकास शिक्षा ठोठावण्यात आली. सिन्यान्हास्कि व डॅनियल यांना परदेशात आपली पुस्तके प्रसिद्ध केल्याबद्दल १९६५ साली पकडून सक्तमजूरीची शिक्षा देण्यात आली आहे. यावरून लेखन स्वातंत्र्य व भाषण स्वातंत्र्य अजून आवाक्याच्या किती बाहेर आहे हे सिद्ध होते.

## पूर्व युरोपातील लेखक

ब्रिटिश किंवा अमेरिकन लोकांना मॉस्को, प्राग किंवा वॉरसॉ येथे लेखकांना येवढे महत्त्व का देतात हे समजणे कठीण जाते. पण रशिया व सबंध पूर्व युरोपात लेखक म्हणजे राष्ट्राची सद्सद्विवेकबुद्धि जागृत ठेवणारा नागरिक समजला जातो. एकोणिसाव्या शतकात लेखकांनीच या देशात नैतिक, राजकीय व सामाजिक जागृतीस सुरवात केली व त्यांनी तशी ती करावी अशी या राष्ट्रांची अपेक्षाही होती. ते अनेक मार्गांनी विचार-प्रवाहांना वळण लावू शकत असत, अनेक मार्गांनी निरनिराळे विचार प्रगट करू शकत असत. अशा तऱ्हेच्या लेखनाने सनदशीरमार्गाने होणाऱ्या चळवळीची जागा घेतली होती तर कित्येक वेळा ललितसाहित्याने राजकीय प्रचाराची जागा भरून काढली होती.

स्टालीनच्या कारकीर्दीत या सर्वांची मुस्कटदाबी झाली. कोठल्याही तऱ्हेचा विरोध त्याला सहन होत नव्हता. त्याच्या मृत्यूनंतर परिस्थिती बदलली. राजकीय वादविवादांची जागा पुन्हा वाङ्मय घेऊ लागले. बुद्धिवादी लेखकांना संधी मिळू लागली. त्यातून अनेक भानगडी उत्पन्न झाल्या. लेखकावर मर्यादा घालणे काही अंशी सोपे असले तरी सर्जनशील कलाकाराच्या कलेवर बंधने घालणे कठीण झाले आहे. कलेतून काय दर्शवावे, काय सांगावे यावर मर्यादा घालणे जवळजवळ अशक्य आहे. आणि कलाकारावर जर बंधने घालता येत नाहीत तर राजकीय विचारवंतावर ती घालणे बरोबर आहे का?

या सर्व बाबतीत रशियाला बरीच प्रसिद्धी मिळते. रशियातील कम्युनिस्ट राजवटीला पन्नास वर्षे होत आली आहेत. त्यामुळे तेथील लेखकवर्गास त्या राज-वटीची सवय झाली आहे. परंतु पूर्व युरोपमधील इतर राष्ट्रांसंबंधी तसे म्हणता येणार नाही. ही राजवट कायम राहील अशी त्यांची खात्री नाही. १९५६ च्या उठावात पोलिश लेखकांचा वाटा मोठा होता. तर



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हंगेरीतील लेखक तेथील क्रांती यशस्वी करण्यास असमर्थ ठरले असले तरी बारीक सारीक चकमकी अजूनही तेथे चालू आहेत. आता झेक लेखकांनी निकराची चढाई करण्यास सुरवात केली आहे असे वाटते.

झेक लोक मोठे सावध वृत्तीचे आहेत. मग त्यांचेत एवढा उत्साह कोठून आला? ते आखाड्यात उशीरा उतरले हे एक कारण असू शकेल. पण आर्थिक क्षेत्रात प्रगतिशील झेक अर्थशास्त्रज्ञांना मिळालेले यशही त्याला कारणभूत असू शकेल. अलिकडे झेक कलाकारांना थोडेफार स्वातंत्र्य मिळालेले दिसत आहे. त्यानी काही सुंदर परंतु मार्क्सवादी नसलेले चित्रपट तयार केले आहेत. त्यामुळे बुद्धिवादी लेखकांना अवसान आले. खाऊ मिळाल्यामुळे भूक वाढली. जूनमध्ये झालेल्या लेखकांच्या परिषदेत वादळाची पूर्व चिन्हे दिसू लागली. अध्यक्ष नोव्होट्नी यांचे आवाक्याबाहेर परिस्थिती गेली.

पाश्चिमात्य लेखकांना केलेल्या जाहीर विनंतीत झेक लेखकांनी सर्व मर्यादा ओलांडल्या. आपण सर्वजण मार्क्सवादी कम्युनिस्ट आहोत असा त्यांचा दावा आहे. त्यांचा जाहीरनामा पश्चिम युरोपातील डाव्या गटाच्या लेखकांना उद्देशून लिहिला आहे. रसेल सार्त्रे, स्टेनबेक यांचेकडून पाठिंबा मिळण्याची त्यात आशा व्यक्त केली आहे. त्यातील बहुतेक मजकूर उदारमतवादी विचारसरणीचा आहे. त्याचा शेवट अध्यक्ष केनडी यांच्या वचनाने केला गेला आहे. याचा परिणाम झेक लेखकांना भोगावा लागेल. झेक सरकारने त्या दिशेने पावले टाकण्यास सुरवात केली आहे. पण शॉच्या म्हणण्याप्रमाणे जर मुस्कटदाबी करावयाची नसेल तर स्टालीन युगीन बंधने तुटलीच पाहिजेत.

जोपर्यंत मोकळी चर्चा किंवा वादविवाद यावरील बंधने कम्युनिस्ट राष्ट्रे उठवीत नाहीत तोपर्यंत पुस्तके स्फोटक द्रव्ये म्हणून वापरली जाणार. हे स्वातंत्र्य मिळेपर्यंत कम्युनिस्ट राजवटींना उत्तरास प्रत्युत्तर करावेच लागेल; नाहीतर या स्वातंत्र्याच्या लढाईचे कम्युनिस्ट राजवटीविरुद्ध लढाईत रूपान्तर होण्यास वेळ लागणार नाही. " आम्हाला पाश्चिमात्य राष्ट्रांची लोकशाही व राजेशाही नको; इथे तशी येऊ लागल्यास आम्ही क्रांती घडवून आणू " असे सिन्याव्हास्कीचे उद्गार आहेत. झेक लेखकांच्या विनंतीत पण " आम्ही सर्व भांडवलशाही समाजरचनेच्या व अर्थरचनेच्या विरुद्ध आहोत. आमची समाजवादावर श्रद्धा आहे. " असे स्पष्ट म्हटले आहे. परंतु त्यांची मदतीची व पाठिंब्याची याचना मात्र पाश्चिमात्यानाच आहे.

दि इकॉनॉमिस्ट, लंडन ९-९-६७.

## समाजातील पोरसवद्या तरुणांचा ( Adolescents ) प्रश्न

बालमानसशास्त्र व तत्सम प्रश्न यांचा विचार करणाऱ्या आंतरराष्ट्रीय केंद्राची ६वी परिषद एडिंबरो येथे नुकतीच भरली होती. समाजातील पोरसवद्या तरुणांच्या प्रश्नावरील चर्चेत निरनिराळया क्षेत्रातील १२०० तज्ञांनी भाग घेतला होता. त्यात मानसशास्त्रज्ञ, वैद्यकीय डॉक्टर्स, समाजशास्त्रज्ञ व धर्मगुरु यांचा मुख्यत्वेकरून भरणा असून ३३ निरनिराळया राष्ट्रांनी आपले प्रतिनिधी या परिषदेस पाठविले होते.

बालमानसशास्त्र म्हणजे मानसिक रोगाने पछाडलेल्या मुलांच्या रोगाचे शास्त्र अशी संकुचित व्याख्या सोडून देऊन मुलांच्या मानसिक वाढीचे सर्वतोपरी विश्लेषण करणारे शास्त्र असा सर्वंकषी दृष्टिकोन परिषदेने घेतला. व त्या दृष्टीतूनच सध्याच्या समाजातील ॲडोलसन्ट मुलांचे प्रश्न विचारात घेतले गेले. एक वर्षाच्या आतील मुलांचे वर होणारे वातावरणाचे व आईवडील व इतर मोठी माणसे यांच्या वर्तणुकीच्या परिणामापासून ते कुटुंबाचा व मुलाचा वैद्यकीय इतिहास व सामाजिक इतिहास इथपर्यंत सर्व गोष्टी तपासण्याची गरज या शास्त्रज्ञांना वाटली. लहान मुलांचे मानसिक रोग, त्यातून उत्पन्न होणारे शारीरिक रोग, त्यांच्या आत्महत्या, मोठी माणसे व लहान मुले यांचेवर एकमेकांच्या वर्तणुकीचे होणारे परिणाम व ॲडोलसन्ट मुलांचे समाजातील स्थान या सर्वांवर विस्तृत चर्चा परिषदेत करण्यात आली.

ॲडोलसण्ट मुलांचे सध्याचे समाजातील स्थान त्यांची सामाजिक पार्श्वभूमी लक्षात घेतल्याखेरीज समजणार नाही असा बहुतेकांचा दावा होता. त्यांच्यावर सभोवतालच्या वातावरणाचा चटकन परिणाम होतो. या वयातील मुले समाजाशी एकरूप होण्याची गरज आहे कारण ती समाजाचा महत्त्वाचा घटक आहेत.







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

### समाजाचे कर्तव्य

निरनिराळया राष्ट्रातील अॅडोलसण्टसचे प्रश्न वेग-वगेळे असणे साहजिक आहे. परंतु अमेरिकन फ्रेंच मानसशास्त्रांचे आपआपल्या देशातील अॅडोलसण्टस् बद्दलचे म्हणणे सारखेच पडले. 'सध्याची ही पोरे आमच्यापेक्षाही सनातनी आहेत' असे त्यांचे म्हणणे. लहान मुलाचे रूपान्तर पूर्ण विकसित तरुणात, जीवशास्त्राच्या नियमाप्रमाणे होते पण ते फक्त त्यांच्या शरिराचेच. मानसिक वाढ अशा चौकटीत बसत नाही. त्यावर अनेक गोष्टींचा परिणाम होतो. ही वाढ पुष्कळ-वेळा सर्व मर्यादा ओलांडते व म्हणूनच ती बहुतांशी प्रत्येक व्यक्तीची निरनिराळया गतीने व मार्गाने होत असते. पण या सर्व निरनिराळया गोष्टीतून पण एक सर्वव्यापी गोष्ट सिद्ध झाली व ती म्हणजे प्रत्येक मुलाला मिळणाऱ्या संधीचा या वाढीवर होणारा परिणाम ! सध्याचे अॅडोलसण्टस् 'जीवनवायु ( oxygen ) नसलेल्या कोठडीत कोंडल्यासारखे आहेत' असे प्रा. रेडल् यांचे म्हणणे. समाज या मुलांचे अस्तित्व फक्त मान्य करतो, त्यांच्या वाढीला किंवा विकासाला प्रोत्साहन देत नाही, वळण लावत नाही. काहींच्या मते या वयातील मुलात असलेल्या गुणांचा उपयोग समाज योग्य रीतीने करून घेत नाही व त्यामुळे एक फार मोठ्या सुप्त शक्तीस तो मुकतो व या मुलांच्या योग्य दिशेने होणाऱ्या वाढीस फाटे फोडण्यास मदत करतो. मोठी माणसे या वयातील मुलांत निर्माण होणाऱ्या शक्तींची दखल घेत नाहीत. शारीरिक वाढ पुरी होत असताच यांचेत फार मोठ्या मानसिक शक्तीची वाढ होत असते याचा सर्वांना विसर पडतो. वयात येत असताच या मुलांना आपल्या-तील सुप्त शक्तींची प्रकर्षाने जाणीव होऊ लागते. त्याला जगातील असत्याचे, वाईट गोष्टींचे निराकरण करण्याची दुर्दम्य इच्छा असते. जगातील वैगुण्ये नाहीशी करून ते योग्यमार्गावर आणण्याची त्यांची खटपट असते. परंतु त्यांचे विचारात स्पष्टता नसते, सफाई नसते त्यामुळे आपण काय करावयास पाहिजे हे त्यांचे त्यानाच कळत नाही; त्यांना समजावून घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या मोठया माणसांना देखील समजणे जड जाते. आणि म्हणूनच या वयातील मुलांना त्यांचे विचार स्पष्ट करून त्याप्रमाणे आचार करण्यास संधी हवी असते. एखाद्या हवा खाण्याच्या ठिकाणी जाऊन दंगामस्ती करण्यात आपली सर्व शक्ती व्यर्थ दवडण्यापेक्षा गटागटाने सर्जनशीलता वाढवून साहसी कामे अंगावर घेण्याची त्यांना संधी समाजात मिळाली पाहिजे. त्यांना गटाची जरूर अनेक कारणाकरता असते. एकतर या वयात गटात असलेल्या मुलाला सुरक्षित वाटते. त्यात त्याला जरूर असलेली शिस्त पाळावी लागते. आपल्या कर्तृत्वाचे कौतुक करणारे मित्र-मंडळ गटामुळे लाभते तर दुसऱ्या बाजूस पराजयाचे दुःख कमी करण्यास पण हे मंडळ उपयुक्त ठरते. त्यामुळे एका बाजूस आपले कर्तृत्व दाखविण्यास संधी व दुसरे बाजूस एकलकोंडेपणापासून संरक्षण मिळावे अशी त्याची इच्छा असते. या वयातील मुले 'लहान मुलासारखी संरक्षणास इपापलेली परंतु आपल्या वया-मुळे निर्माण झालेल्या झंझावाती शक्तींनी बंडखोर बनलेली' असतात.

### ऐतिहासिक पार्श्वभूमी

डॉ. लोवेनफील्ड यांचे म्हणण्याप्रमाणे मानव समा-जाने अॅडोलसण्ट मुलाबद्दल नेहमीच सनातनी दृष्टिकोन स्वीकारला आहे हे खरे नाही. १३४६ साली इंग्लंडच्या तिसऱ्या एडवर्ड राजाने आपल्या १६ वर्षाच्या मुलाला लढाईत आघाडीच्या तुकडीचा म्होरक्या बनवले. या मुलाच्या जिवाला धोका आहे असे वाटल्यावरून एक जासूद राजाकडे येऊन त्याला परत बोलवावे म्हणून विनंती करू लागला तर राजाने सांगितले की "तो जिवंत असेपर्यंत माझेकडे येण्याचे काम नाही त्याला आपली सरदारकी मिळविण्याची संधी द्यावी असा माझा हुकूम आहे." हा राजपुत्र पुढे उत्तम सेनानी व मुत्सद्दी बनला. सोळाव्या शतकात अकरा वर्षाच्या मेरी अंगलीक अरनॉल्ड या मुलीला पोर्टरॉयल या पॅरीसच्या कॉन्व्हेंटची प्रमुख केले. सतरा वर्षाची होई-पर्यंत या मुलीने कॉन्व्हेंटमध्ये अनेक सुधारणा केल्या व ती धार्मिक चळवळीचे नेतृत्व करू लागली. जोन ऑफ आर्क या अल्पवयीन मुलीची कथापण सर्वश्रुत आहे. या उलट आजच्या मुलांना आपण कोणतीच संधी देत नाही. या मुलांतील ध्येयनिष्ठा व तारुण्यसुलभ कामाची हातोटी मोठया माणसांना लाजवू शकतील. आणि त्यामुळेही समाज या मुलांना पुरेशा संधी उपलब्ध करून देत नाही. अंतर्गत सुप्त शक्तींना वाव न मिळाल्यामुळे त्यांचे लक्ष मोडतोड, हाणामारी किंवा लैंगिक गुन्हेगारी इकडे वळते. या सर्व अडचणींना तोंड











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

देऊन डोके वर काढून नाव कमावणाऱ्या ॲडोलसण्ट मुलांना देव मानले जाते. त्यांना डोक्यावर नाचवण्यात येते. बीटल्सचे उदाहरण ताजे व जगप्रसिद्ध आहे.

ज्या समाजात ॲडोलसण्ट मुलांना योग्य त्या संधी मिळतात त्या समाजातील मुले आपल्या संहारक प्रवृत्तींना आळा घालून नैसर्गिक रीत्या मोठी होतात. अमेरिकन सरकारने शांतिपथकासारखेच राष्ट्रीय पातळीवर कर्मपथके ( Job Corps ) तयार करण्यास उत्तेजन देण्यास सुरवात केली आहे. कामाकडे या मुलांची शक्ती वळवली नाही तर तिचा स्फोट होईल हे त्यांनी ओळखले आहे.

मेडिकल जर्नल, सप्टेंबर १९६७

## उपग्रहावरून दळणवळण

जगात शांतता नांदावयाची असेल, तर जगातील माणसांनी एकमेकांना समजावून घेतले पाहिजे. ज्याप्रमाणे नव्या व परक्या गोष्टींचे व्यक्तींना भय वाटते त्याप्रमाणेच राष्ट्रांनाही वाटते. म्हणूनच माणसामाणसात सारख्या असलेल्या गोष्टींची ओळख एकमेकांना होणे जरूर आहे. अशी ओळख झाल्यास एकमेकात झगडण्याची इच्छा बळावणार नाही. म्हणजे मुख्य प्रश्न आपसातील दळणवळणाचा आहे.

तंत्रविद्येने हा प्रश्न सोडवण्यात फार मोठे यश संपादन केले आहे. एकमेकाशी संबंध प्रस्थापित करणारे उपग्रह अवकाशात सोडता येऊ लागल्यापासून टेलिफोनच्या तारावर अवलंबून रहाण्याची गरज कमी होऊ लागली आहे. अवकाशात माणूस ज्याप्रमाणे चक्कर मारू शकतो त्याप्रमाणेच हे उपग्रह माणसांचे आवाज किंवा चित्रवाणी जगात कोठेही नेऊ शकतात.

**अमेरिकेचे कार्य–** १९६२ च्या कायद्याने उपग्रहावरील दळणवळणासंबंधी अमेरिकेचे कार्य निश्चित करण्यात आले. या कायद्यानुसार कॉमसॅट (COMSAT-Communications Satellite Corporation) या खाजगी कंपनीला व्यापारी उपग्रह सोडण्यास परवानगी देण्यात आली. १९६४ साली या कंपनीत आणखी १० राष्ट्रांनी प्रवेश करून इंटरनॅशनल टेलिकम्युनिकेशन्स सॅटलाईट कन्सॉर्टियम (INTELSAT) निर्माण केले. या कन्सॉर्टियमचे सध्या ५० सभासद आहेत. प्रत्येक सभासदाने या कंपनीत भांडवल गुंतवले असून या दळणवळणपद्धतीचा ते उपयोग करून घेत आहेत. या कंपनीची प्रगती झपाट्याने होत असून ॲटलांटिक व पॅसिफिक महासागरावरील दळणवळण सुरू झाले आहे. १९६९ पर्यंत सर्व जगभर निरोप पाठवणारी व मिळवणारी ४६ केंद्रे प्रस्थापित होतील.

ही कंपनी सुरू झाल्यापासून अवघ्या ५ वर्षांच्या काळात या उपग्रहदळणवळणाने मुख्यत्वेकरून तीन दिशांनी प्रगती केली आहे.

(१) सिंक्रोनस सॅटलाईट-म्हणजे पृथ्वीच्या वेगानेच पृथ्वी भोवती फिरणारे उपग्रह सोडणे. यामुळे पृथ्वीवरील एकाच भूभागाशी त्याचे स्थिरसंबंध रहातात.

(२) अमेरिकेचे आंतरराष्ट्रीय दळणवळण चालू ठेवणारे उपग्रह सोडणे.

(३) अमेरिकेचे राष्ट्रीय दळणवळण करणारे उपग्रह, जागतिक उपग्रह पद्धतीशी संलग्न करणे– १९६४ साली स्थापन झालेल्या इंटेलसॅटची आता ५८ राष्ट्रे सभासद असून त्यात भारतही आहे. या कंपनीचा उद्देश सबंध जगभर उपग्रहाकरवी दळणवळण वाढवणे असा आहे.

जागतिक दळणवळणाच्या पद्धतीमुळे अविकसित राष्ट्रांचा विशेष फायदा होणार आहे. या राष्ट्रांची स्वतःची दळणवळण पद्धति अजून अद्यावत झालेली नसून पुढारलेल्या राष्ट्रांशी संबंध प्रस्थापित करणे या पद्धतीमुळे त्यांना सहज शक्य होईल. काही थोड्याशा पुढारलेल्या राष्ट्रावरील त्यांचे अवलंबून रहाणे कमी होईल व त्यांच्या खर्चातही पुष्कळशी बचत होईल.

आज रंगूनहून जकार्ताला फोन करावयाचा असल्यास तो टोकिओमार्गे जावा लागतो. सेनेगल ते नायजेरियाचा फोन पॅरीस व लंडन मधून जोडावा लागतो. लॅटीन अमेरिकेचे सर्व फोन न्युयार्क मार्गे जावे लागतात. या सर्वांत वेळेप्रमाणेच पैशाचाही पुष्कळच अपव्यय होतो. परंतु उपग्रहावरील दळणवळणाचे आड भौगोलिक मर्यादा येत नाहीत. त्यांना तारांची वेंडाळी लागत नाहीत व भाषा व तत्त्वज्ञान यांच्या मर्यादा पण ते ओळखत नाही. म्हणून कोणत्याही प्रकारचा भेदाभेद न करता संपूर्ण समतेच्या तत्त्वावर हे दळणवळण चालू शकते. या दळणवळणाचा फायदा घेण्याकरता प्रत्येक देशात एक संदेश घेणारे व पाठवणारे केंद्र असले म्हणजे पुरे आहे. या केंद्राचा खर्च न झेपणारी राष्ट्रे मात्र पोरकी बनण्याचा संभव आहे. परंतु लहानलहान राष्ट्रे सहकारी तत्त्वावर ही केंद्रे उभारू शकतील. या अविकसित राष्ट्रांनी या केंद्र









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उभारणीस तावडतोब सुरवात करावी अशी परिस्थिती निर्माण झालेली आहे.

सध्या या दळणवळणांचा जास्तितजास्त वापर अमेरिका करीत आहे व त्यामुळे बऱ्याच अंशी ते त्यांच्या वर्चस्वाखाली आहे. परंतु सध्याची परिस्थिती १९६९ साली बदलू शकेल अशा तऱ्हेची व्यवस्था इंटेलसॅट मध्ये केलेली आहे. व अमेरिकेचीही ही व्यवस्था खरीखुरी आंतरराष्ट्रीय करण्याची तयारी आहे. इंटेलसेटच्या सर्व सभासदांची एक कमिटी नेमून त्यांचेकडे सर्व जबाबदारी व व्यवस्था १९६९ नंतर सोपविता येईल. त्याचप्रमाणे तांत्रिक माहिती सर्व राष्ट्रांना पुरविण्याची पण काहीतरी व्यवस्था करता येईल.

**राष्ट्रीय दळणवळण**— याच पद्धतीचा उपयोग प्रत्येक राष्ट्रास आपआपली दळणवळणपद्धती सुधारण्यास करता येईल. पॅरीस ते न्युयार्क दूरवाणी व चित्रवाणी चालवणारे हे उपग्रह न्युयार्क ते लॉस एंजलीसमधील दळणवळण सांभाळू शकतील. परंतु ही पद्धती मुख्यत्वेकरून जागतिक राहील. त्याचा आपल्या राष्ट्रासाठी कसा उपयोग करून घ्यावा हे त्या त्या राष्ट्रावर अवलंबून राहील. या उपग्रह पद्धतीतील उपग्रह आपआपली जागा कायम ठेवीत असतात. त्याचप्रमाणे त्यावरून वापरली जाणारी भाषा आंतरराष्ट्रीय आहे (All Satellites use the internationally regulated frequency Spectrum) व या सर्व उपग्रहातून प्रसृत होणारी इलेक्ट्रो मॅगनेटिक शक्ती इतर दळणवळण पद्धतील अडथळा निर्माण करू शकतो.

आपल्या राष्ट्रासाठी ही पद्धती वापरावयाची असल्यास इंटेलसॅटकडून ती भाड्याने घेता येईल. किंवा स्वतःपुरते राष्ट्रीय पातळीवर उपग्रह सोडावे लागतील किंवा शेजारच्या राष्ट्राशी सहकार्य करून एकत्र पद्धती निर्माण करता येईल. कोणत्या राष्ट्राजवळ किती पैसे आहेत यावरच मुख्यत्वेकरून यातील निवड अवलंबून राहील. परंतु या सर्व दळणवळणपद्धतींना एक केंद्रित नियंत्रण असावे लागेल. तांत्रिक दृष्ट्या तर त्यांची आवश्यकता फारच आहे. कारण प्रत्येक उपग्रहाला आपआपली जागा टिकवावी लागेल. त्याचप्रमाणे फ्रिक्वेन्सि नियंत्रण पण आवश्यक आहे. या सर्व दृष्टीने विचार करता आंतरराष्ट्रीय दळणवळण पद्धतीत सामील होणेच बहुतेक सर्व राष्ट्रांना परवडणार आहे.

अजून इंटेलसॅटमध्ये सोव्हिएट रशिया व पूर्व युरोपिअन राष्ट्रे सामील झालेली नाहीत. तसे त्यानी सामील व्हावे म्हणून अमेरिकेची खटपट चालू आहे. अवकाशयानांचा शांततामय जीवनासाठी उपयोग करावा अशा तहावर रशियाने नुकतीच सही केली आहे. त्याची पुढची पायरी म्हणून रशियाने इंटेलसॅट मध्ये सामील होण्यास हरकत नाही. रशिया स्वतः उपग्रहतंत्रात अत्यंत पुढे गेलेला आहे. सर्व जगाला त्याचा फायदा मिळवून देण्याची वेळ आलेली आहे.

**आंतरराष्ट्रीय दळणवळणाची मालकी**—अमेरिकेचे राष्ट्रीय धोरण प्रत्येक क्षेत्रात चढाओढ असावी असे आहे. अनेक तांत्रिक योजनातून अशी चढाओढ आजही अस्तित्त्वात आहे. परंतु आंतरराष्ट्रीय क्षेत्रात अशा तऱ्हेची मालकी चालू रहाणे योग्य आहे का हा महत्त्वाचा प्रश्न आहे. अनेक खाजगी कंपन्यांचे अस्तित्व मान्य केल्यास त्यांचे दर कमीजास्त चढाओढीचे रहातील. परंतु त्याबरोबरच अनेक केंद्रांची ठिकठिकाणी पुनरावृत्ती होण्याची व त्यामुळे खर्च वाढण्याची शक्यता पण आहे. अनेक अमेरिकन कंपन्या जर यात भाग घेऊ लागल्या तर आंतरराष्ट्रीय व्यवहारात अमेरिकेला एकमुखी धोरण ठेवणे जड जाईल. कदाचित संरक्षणखात्याच्या दळणवळणाला पण उशीर लागण्याची शक्यता निर्माण होईल. या सर्व गोष्टींचा विचार करावा लागेल. कदाचित बिनतारी व टेलिफोन दळणवळण बराचकाळपर्यंत शिल्लक ठेवावे लागेल.

नव्या तंत्रशास्त्राने माणसास फार मोठे आव्हान दिलेले आहे. त्याने माणसाला एकमेकाशी सहजगत्या बोलण्याची संधी प्राप्त करून दिली आहे. लढण्यापेक्षा बोलण्याने प्रश्न सोडविण्याची अपूर्व संधी या युगातील माणसाला मिळालेली आहे. या संधीचा योग्य फायदा घेण्यावर, तंत्रविद्येकरवी मनुष्यजातीचे कल्याण करण्यावर माणुसजातीचा इतिहास घडणार आहे. दळणवळण करणाऱ्या उपग्रहांनी माणसाला, बघण्याची, बोलण्याची एकमेकाला समजावून घेण्याची, स्वतःचे विचार मांडण्याची व जगात ते कोठेही पोचविण्याची अमूल्य संधी दिलेली आहे. ती घेणे न घेणे माणसावर अवलंबून आहे.

व्हयू पॉइंट यु. एस. ए. ८-९-६७







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ५३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ७ (संपूर्ण) | | २५०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०·०० |
| (८) नवमानवतावाद ... ... ... | | २·५० |
| (९) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३·०० |
| (१०) चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| | (प्रा. सदाशिव आठवले) ... | ३·०० |
| (११) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २·६० |
| (१२) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | | |
| | (श्री. चा. अ. दाभोलकर) .... | २·०० |
| (१३) सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती | | |
| | (प्र. रा. देशमुख) ... ... | ४·०० |
| (१४) इतिहासाचे तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | | ६·०० |

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

